प्रकाश-मंडळ—पुस्तक २४ वें




भाग ६ वा

यशवंत गोपाळ जोशी



२१ नोव्हेंबर ]     किंमत १। रुपया     [ १९४०



काहीं आळस आणि कांहीं धंदा यामुळें माझ्याजवळ इच्छा आणि
मजकूर असूनहि लेखनाकडे माझें दुर्लक्ष होत असतां मी
लेखक आहे याची मला आठवण करून देणाऱ्या,
आणि माझ्याकडून थोडें लेखन करवून
घेणाऱ्या सर्व साप्ताहिकांच्या
आणि मासिकांच्या

**दिवाळी अंकाच्या**

# कल्पनेस

हें पुस्तक कृतज्ञतापूर्वक अर्पण केलें आहे.

**—य. गो. जोशी**



'पुनर्भेट'च्या या सहाव्या भागांत कांहीं लघुनिबंध व कांहीं लघुकथा आहेत. माझें लेखनाकडे पुष्कळ कारणांमुळें दुर्लक्ष होतें; पण त्यांतील कांहीं व्यावहारिक कारणें सोडलीं तर– लिहावेंसें वाटतें आणि कांहीं काळ थांबावेंसेंहि वाटतें अशी माझ्या मनाची कांहीं एक विचित्र स्थिति झाली आहे. याचें थोडेंसें व्यावहारिक उदाहरणानें वर्णन करायचें झालें तर वर्ग बदलतांना जी मुलांची मनःस्थिति असते त्या मनःस्थितींत सध्यां मी आहे.

माझ्या कांहीं वाचकांची 'होमकुंडा'च्या उत्तरार्धाबद्दल तक्रार आहे. तो मात्र सध्यां मी लिहीत आहे आणि चार-सहा महिन्यांत होमकुंड-उत्तरार्ध वाचकांच्या हातीं पडेल. उत्तरार्धास वेळ लागल्यामुळें कांहीं वाचकांची जी त्या कथानकाबद्दल ताटकळल्यासारखी मनःस्थिति झाली आहे त्याबद्दल त्यांनीं मला क्षमा करावी.

'पुनर्भेट' भाग ६ वा इतक्या लवकर प्रसिद्ध होत आहे याचें कारण माझे स्नेही श्री. कोपर्डेकर यांस माझें एक पुस्तक प्रकाशनार्थ पाहिजे होतें हें आहे.

**य. गो. जोशी**

---

# श्री. यशवंत गोपाळ जोशी
## यांचीं पुस्तकें

| | |
|---|---|
| पुनर्भेट भाग १ ला ( द्वितीयावृत्ति ) | १– ४–० |
| पुनर्भेट भाग २ रा | १– ०–० |
| पुनर्भेट भाग ३ रा | १– ४–० |
| पुनर्भेट भाग ४ था | १– ४–० |
| पुनर्भेट भाग ५ वा | १– ४–० |
| तुळशीपत्र ( कथासंग्रह ) | १– ८–० |

## नाटकें

| | |
|---|---|
| भोळाशंकर | १– ०–० |
| संगीत श्रीमुखांत | ०–१२–० |
| बोलका सिनेमा | ०– ८–० |

## कादंबरी

| | |
|---|---|
| हिरकणी ( शिल्लक नाहीं ) | |
| होमकुंड ( पूर्वार्ध ) | २– ०–० |
| श्रीकांत | १– ०–० |
| त्रिदोष | १– ०–० |
| पडसाद | २– ०–० |

## लवकरच प्रसिद्ध होणारीं पुस्तकें

साहित्यिकांची सफर ( विनोदी कादंबरी )

होमकुंड ( उत्तरार्ध )

# वाद-विवेचन-माला संपादक—पां. वा. गाडगीळ

## या मालेंत प्रसिद्ध होणारीं तेरा पुस्तकें

| | | |
|---|---|---|
| ×१ | सुलभ समाजवाद (पां. वा गाडगीळ) | ०— ८—० |
| ×२ | फॅसिझम् (पां. वा. गाडगीळ) | ०— ८—० |
| ×३ | साम्राज्यशाही (कॉ. ना. ग. गोरे) | ०— ८—० |
| ×४ | अराज्यवाद (पां. वा. गाडगीळ) | ०— ८—० |
| ×५ | लोकशाही (आचार्य जावडेकर) | १— ०—० |
| ×६ | मार्क्सचा भौतिकवाद (पां. वा. गाडगीळ) | ०—१२—० |
| ७ | ईश्वरवाद (सोनोपंत दांडेकर) | ०—१२—० |
| ८ | गांधीवाद (आचार्य भागवत) | ०—१२—० |
| ९ | जडवाद (तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी) | ०—१२—० |
| १० | राष्ट्रवाद (रावसाहेब पु. ह. पटवर्धन) | ०—१२—० |
| ११ | कम्यूनिझम (कॉ. के. एन्. फडके) | ०—१२—० |
| १२ | हिंदुत्ववाद (त्रिकाळकर्ते शि. ल. करंदीकर) | १— ०—० |

आणि मालेचें तेरावें पुस्तक म्हणून

**मार्क्सच्या 'कॅपिटल' या ग्रंथाचा मराठी सारग्रंथ** किं. १०रु.

अशीं एकूण १८॥ रुपये किंमतीचीं पुस्तकें आज आगाऊ वर्गणीदार होणारांस

**फक्त १२ रुपयांत मिळतील.**

मराठींत या धर्तीची ही पहिलीच माला असून प्रचलित वादग्रस्त प्रश्नांचीं तात्त्विक स्वरूपें सांगणारा हा **ज्ञानकोश** होय !

प्रकाशक : **यशवंत गोपाळ जोशी**, ६२३/१८ सदाशिव, पुणें.

---

× हीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत.

# प्रकाशित

| | | |
|---|---|---|
| १ | जीवनाचा पाया, बा. कृ. गलगली | १-८-० |
| २ | विवाहितांचें नंदनवन, राजरत्न जोशी | १-०-० |
| ३ | अविवाहितांचे प्रश्न, ,, | १-०-० |
| ४ | स्त्रियांचे हक्क व सुधारणा, ,, | ०-८-० |
| ५ | फासिझम्, मानवेंद्रनाथ रॉय | १-०-० |
| ६ | आगरकर, पु. पां. गोखले | ०-४-० |
| ७ | समाधीवरलीं फुलें, वि. स. खांडेकर | १-०-० |
| ८ | जलधारा, वि. वि. बोकील | १-०-० |
| ९ | मानलेलीं मुलें, मा. भ. नंदुरकर | १-०-० |
| १० | स्त्रीजीवन, सानेगुरुजी | १-०-० |
| ११ | क्रांति, ,, | १-८-० |
| १२ | पुनर्भेट, भाग ६ वा, य. गो. जोशी | १-४-० |

## आगामी

१ मंगळागौरीच्या रात्रीं (कादंबरी) बोकील

२ ? ( ,, ) द. र. कवठेकर

३ ? (कथा) सानेगुरुजी

**प्रकाश-मंडळ,**

५२९ सदाशिव, पुणें २.

## बेबी आणि शांती : : १

सकाळचे दहा-साडेदहा वाजतां मी घरीं आलों आणि तोंडानें कांहीं तरी गाणें गुणगुणत अंगांतील कपडे काढून आंघोळीच्या तयारीला लागलों.

मला कांहीं तरी चुकल्या चुकल्यासारखें वाटूं लागलें आणि मी डोळे किलकिले करून विनाकारणच आजूबाजूला पाहूं लागलों, पण मला तसें कां वाटतें आहे हें माझ्या लक्षांत येईना.

अखेर शेवटीं अंगणांत आलों. मी आपलें आपल्याशींच हसल्यासारखें केलें. आणि मग माझ्या लक्षांत आलें कीं, या वेळीं शांती-बेबीचा दंगा घरांत असायचा तो या वेळीं नव्हता.

मग मीं पटकन् हाक मारली,

"शांते—"

पण शांतीनें उत्तर द्यायच्या ऐवजीं माडीवरून बेबीनेंच मला हाक मारली,

"भाऽऊ—!"

मीं 'ओ' न देतांच वर पाहिलें. माडीवरच्या सज्जांत गजाला धरून बेबी म्हणत होती,

" भाऊ मी नाहीं आतां खालीं येणार ! "

" असं का ? "

मीं हसत हसत म्हटलें आणि शांतीला हाक मारूं लागलों.

शांतीहि गंभीर चेहरा करून खालच्या दारांत उभी होती. तिनें फुरंगटलेल्या आवाजांत मला सांगितलें,

" भाऊ, मी नाहीं आतां कधीं वर जाणार ! "

'काय पेचप्रसंग निर्माण झाला आहे !' असें वाटण्याइतका काळजीखोर चेहरा करीत मीं म्हटलें,

" कां ग ? "

—आणि मला कळलें कीं, त्या दोघी त्यांच्या दृष्टीनें 'महाभयंकर' कारणावरून पण आमच्या दृष्टीनें अत्यंत क्षुल्लक कारणावरून भांडल्या होत्या.

शांती आणि बेबी या पांच किंवा सहा वर्षांच्या मुली. आमच्या वाड्यांत तेवढ्याच दोन मुली असल्यामुळें 'भांडणें' आणि 'गोडींत येणें' या दोन्ही गोष्टी त्यांना एकमेकींतच करणें भाग होतें.

इतक्यांत बेबीनें वरून मला हाक मारली.

" भाऊ, मी नाहीं खालीं येणार– पण तुम्ही वर या."

" कशाला ? "

" आमच्याकडे आज शिकरण केली आहे ! "

खालीं उभ्या असलेल्या शांतीला वाटलें कीं मी आतां वर जाणार म्हणून. ती मला घाईघाईनें सांगूं लागली,

" भाऊ, तूं नको रे वर जाऊंस; आपल्या घरीं आज श्रीखंड-पुरी करायची आहे ! "

" अन् आमच्याकडे लाडू करायचे आहेत ! " बेबीनें वरून पुकारा केला.

" मग आम्ही आमच्याकडे बासुंदी करूं ! " शांतीनें मला उत्कंठित हर्षानें सांगितलें.

आणि मग जी त्या दोघींची चढाओढ लागली त्यांत पक्वान्नांचीं सर्व

नांवें खलास झालीं! एक घरगुती गमतीदार प्रसंग म्हणून मी आंघोळीचें पाणी तसेंच निवत ठेवून तो आनंद अनुभवीत उभा होतों.

पण इतक्यांत—

माझ्यांतला 'लेखक' का काय म्हणतात तो जागा झाला आणि मग मी वरील प्रसंगाकडे जरा निराळ्या दृष्टीनें पाहूं लागलों.

—आणि मग मला खूप हसायला यायला लागलें.

मला वाटलें दोन निरनिराळ्या पक्षांतल्या पुढाऱ्यांप्रमाणें या दोघी कां थापा मारीत आहेत?

**"आम्हांला निवडून द्या— आम्ही देशाचं नंदनवन करूं!"**
वगैरे निवडणूक-गर्जनांप्रमाणेंच निरनिराळ्या कल्पनांचीं पक्वान्नें, पुढारी आपल्या मतदारांना खूष करण्याकरितां खाऊं घालीत असतात त्याप्रमाणें या दोघींनीं कां चालविलें आहे?

बेबी-शांतीच्या घरच्या माणसांना त्यांनीं इच्छिलेलीं पक्वान्नें करण्याची ऐपत होती. त्यांनीं तीं केलींहि असतीं; पण त्या दोघी बाता मारीत होत्या म्हणून का तीं पक्वान्नें त्यांच्या घरीं होणार होतीं?

—अगदीं हुबेहुब पुढाऱ्यांसारखें!

लहान मुलांसारख्याच पुढाऱ्यांनाहि कल्पना सुचतात म्हणायच्या!

—पण हाय! असें साम्य जुळवून काय फायदा?

—आणि आनंद तरी?

—त्या बालिकांच्या त्या इच्छा निरागस होत्या—
आणि पुढाऱ्यांचा दंभ?

—सबंध एक पुस्तक लिहितां येईल त्याच्यावर!

* * *

दुपारचें जेवण झाल्यानंतर मीं थोडी विश्रान्ति घेतली आणि सहज माझ्या मनांत कांहीं तरी कल्पना आली.

मीं घरांतलाच थोडासा खाऊ घेतला आणि तो एका मुठींत धरीत मीं वरच्या बेबीला खालीं हाक मारली.

—पण खाऊचें आमिष दाखविण्याचेंहि मला कारण पडलें नाहीं.

—बेबी मनमोकळ्या आनंदानें खालीं आली.

—मग मी शांतीला हाक मारूं लागलों.

—शांतीहि वाऱ्यासारखी धावत आली.

मीं विनाकारण गंभीरपणाचा आव आणला आणि दोघींना विचारूं लागलों—

" तुमच्यापैकीं शहाणं कोण आहे ? "

" मी !— मी ! ! "

दोघीहि अहमहमिकेनें माझ्याभोंवतीं बागडूं लागल्या.

" मग तुम्ही आज सकाळीं कां भांडलांत ? "

त्यांना हा प्रश्न विचारण्यांत माझीच चूक झाली होती. कारण त्या दोघींचीहि मधें थोडी झोप झाली होती हें मी विसरलों होतों. आणि त्या झोपेच्या चिमण्या कालखंडांत त्या आपलें भांडण विसरून गेल्या होत्या.

" आम्ही कधीं भांडलों ? " दोघींनींहि मला आश्चर्यभरांत विचारलें.

मला हसूं येऊं लागलें. आणि मीं हातीं धरलेल्या— खडीसाखर, बेदाणा-इत्यादि खाऊचे कांहीं खडे माझ्या हातून खालीं गळून पडले.

" आम्हांला खाऊ ! आम्हांला खाऊ ! ! "

खालीं पडलेले खडीसाखरेचे खडे वेचीत त्या दोघीहि कोंबडया म्हणाल्या.

—आणि मला कसला तरी मजेदार आनंद वाटला आणि मीं माझ्या हातांतला सर्व खाऊ मुद्दाम जमिनीवर उधळून दिला !

दोघींनींहि तो तत्परतेनें वेचला आणि दोघीहि एकमेकींजवळ येऊन 'मला कित्ती—मला कित्ती—' म्हणून एकमेकींना आपल्या खाऊ-भरल्या मुठी दाखवूं लागल्या.

मीं दोघींनाहि म्हटलें, " आतां नाहीं ना भांडणार तुम्हीं ? "

" अंऽहं ! "

—शांतीनें गिरकी मारीत म्हटलें.

" अगदीं कध्धीं कध्धीं नाहीं ! "

—बेबीनें खडीसाखरेचा खडा तोंडांत टाकीत म्हटलें.

मी हसत हसत त्यांना म्हणालों, "मग तुम्ही फुगडी खेळा पाहूं एकदां!"

"फुगडी?"

"हं!"

दोघींनींहि आपल्या परकरांचे ओचे घातले. आपले केस सावरले आणि पाहतां पाहतांच त्या वाटोळ्या फिरत घुमूं लागल्या—

**"आम्हि दोघि मैत्रिणि जोडीच्या।**
**जोडीच्या॥**
**हातांत पाटल्या तोडीच्या।**
**तोडीच्या॥"**

त्या फुगडीकडे पाहतांच हसत हसत माझ्या चेहऱ्यावर एकदम गांभीर्य आलें आणि वाटलें—एका घरांत हें शक्य आहे—लहान बाळं आहेत म्हणून हें शक्य आहे.

पण— असा कोणी मोठा माणूस भेटेल का, कीं जो आमच्या पुढाऱ्यांना खाऊ देऊं शकेल?

— आमचे पुढारी कधीं इतके साधे-भोळे आणि सात्त्विक होतील का, कीं एखाद्या त्यांच्यापेक्षांहि मोठ्या माणसानें त्यांना 'शहाणे' कोण म्हणून विचारतांच ते आपलीं भांडणें विसरतील? —आणि आपापसांत ऐक्याची फुगडी खेळूं लागतील—?

मधून मधून मी बेबी-शांतीच्या फुगडीकडे पाहत होतों. आणि त्यांच्या त्या फुगडीच्या रिंगणांत मला हिंदुस्थानचा नकाशा दिसूं लागला!

—आणि माझी मानसिक उदासीनता जास्त जास्तच वाढूं लागली.

आणि मला वाटलें, जोंपर्यंत 'कांहींच' शहाणे आहेत तोंपर्यंत ते राहिले-त्यांची वेठ वळणारच आणि मग त्यांच्यांत भांडाभांडी होणारच—आणि मग त्या शहाण्यांत धंदेवाईक स्पर्धा चालणारच!

आणि मग असे पिसाळलेले दोन बाजूचे शहाणे–काय समजुतीची फुगडी घालणार!

असेल नसेल तें खाण्याची ज्यांची महत्त्वाकांक्षा, ते विद्वान 'खाऊच्या पुड्या'ला का भाळणार आहेत ?

—भाळतील ! भाळतील !!

—पण केव्हां ?

—जेव्हां पुढाऱ्यांशिवाय चळवळी चालूं शकतील अशी लोकांची तयारी होईल तेव्हां !

—अजून आपल्याकडे लोकमत आहेच कुठें ?

—मतभेदाच्या—पक्षोपपक्षांच्या टोपल्या आहेत—त्यांवर मतभेदाच्या चिठ्या लावलेल्या आहेत—आणि मग कांद्याच्या टोपलींत जे पदार्थ साठवले जातील ते कांदे; आणि बटाट्याच्या टोपलींत जे पदार्थ पडतील ते बटाटे !

—हें लोकमत !

—आणि मग कित्येक वेळेला या कांद्या-बटाट्यांची गमतीदार उलटा-पालटहि होते !

कोंबडीचीं अंडीं जशीं मालक पळवितो तशीं मतांचीं अंडीं पुढारी पळवतात. कांहीं दिवस तीं अंडीं बैदुलासारखीं मोजून पुढारी आपल्या पक्षाचें बलाबल मोजतात—

—आणि ह्या मतांच्या अंड्यांत 'खूट' पडूं नये म्हणून पुढारी कांहीं कोंबड्याहि पाळतात ! त्यांचीं सगळींच अंडीं पळवीत नाहींत—त्यांची भावी पिढीहि तयार होऊं देतात—आणि मग त्या चिल्यापिल्यांनीं आपल्या कळपां-तून दुसऱ्या कळपांत पळून जाऊं नये म्हणून—

—पुढारी शांती-बेबीसारखे ओरडत असतात.

"आमच्याकडे शिकरण—श्रीखंड—पुरी—बासुंदी ऽ य !"

—आणि या व अशा आरडाओरड्यानें मतांच्या कोंबडया—पिलें—अंडीं वाढत राहतात.

—पुढारी मोठा होतो—सुलतान होतो.

—लोकमत तसेंच राहतें !

—आणि कांहीं लोक मग कुजबुजूं लागतात,

" हिंदुस्थानांत काय भयंकर चळवळी चालू आहेत ! "

—पण या सर्व चळवळी पुढाऱ्यांच्या आहेत !

—मतदारांच्या नाहींत !

—आजचे मतदार हे एखाद्या थोरामोठ्यांच्या लग्नांतील वऱ्हाड्यांसारखे आहेत ! जेवायला बोलावलें पानावर बसतात— मिरवणुकीला हाक मारली रांग करून उभे राहतात– पळतात– ओरडतात !

—आणि त्या आरडाओरडीवरून आपण हिंदुस्थानांतील अशान्तता मोजतों !

—हिंदुस्थानांत सध्यां अनेक चळवळी चालू आहेत. पण पुढारी काबूंत आणण्याची नवी चळवळ निघायला हवी—कारण,

" आमच्याकडे शिकरण, श्रीखंड-पुरी, बासुंदी ऽ य ! " या आरोळ्यांनीं तोंडाला पाणी सुटून इच्छापूर्ति न झाल्यामुळें मतदारांच्या आणि लोकांच्या तोंडाला आतां फक्त कोरड पडली आहे !

—शांती-बेबीच्या ओरडण्यांत जसें मला माहीत होतें, कीं फक्त त्या पक्वान्न सुचवीत आहेत– करायचींच झालीं तर तीं आपल्यालाच करायचीं आहेत– त्याप्रमाणें पुढारी फक्त कल्पना सुचवतात; त्या मतदारांनींच अमलांत आणायच्या असतात ! – शेतांत जसें पाखरांना एक मडक्याचें 'बुजगावणें' करून ठेवतात– तेवढाच फार तर पुढाऱ्यांचा उपयोग–!

—जमीन कसायची आपण– मशागत करायची आपण—तें आपण केलें आणि मग जरी पुढारी 'ओरडत राहिले' तरी मग आपण त्यांची वात्सल्यानें समजूत घालूं—आणि त्यांना ऐक्याची फुगडीहि खेळायला लावूं !

---

# एकच भाव : : २

कांहीं कांहीं क्षुल्लक बाबतींतील योगायोगसुद्धां मनाला आश्चर्याचे धक्के देतात! बरेच दिवसांत आपला एखादा स्नेही आपल्याला भेटला नाहीं म्हणून त्याला भेटण्याकरितां आपण आपलें घर सोडून चार पावलें टाकावींत तों-तोच आपल्या घरीं येतांना दिसावा- मनाला एक बारीकसा आश्चर्याचा धक्का बसतो!

—आपण कांहीं तरी आनंदांत असावें आणि आपल्या मनांतलि आनंदाचेंच गाणें केल्याप्रमाणें एखादें अर्थवाहक पद मंजुळ नादलहरींत त्याच वेळीं कोठून तरी आपल्या कानीं पडावें!

—किंवा एकाद्या वेळीं याच्या विरुद्धहि होतें!

—आपल्या पायांतली वहाण किती तरी दिवस टिकली या विचारांत आपण पावलें टाकीत असतों—आणि आपला तो विचार संपायच्या आंतच आपल्या पायांतील वहाणेचा अंगठा तुटतो!

—किंवा, आपल्या घरांतील वारकरी किती सात्त्विक आणि हुशार आहे असें आपण कांहीं तरी कारणावरून सहज उद्गारावें आणि त्याच वेळीं आपण आपल्या खिशांत हात घालावा आणि त्यांतील कांहीं पैसे नाहींसे झाल्याचें आपल्या लक्षांत यावें—

—असे किरकोळ योगायोगाच्या आश्चर्यांचे धक्के आपल्याला आयुष्यांत नेहमीं बसत असतात; पण त्यांचा आनंद अनुभविण्याची आपल्या नेहमींच्या जीवनाच्या घाईत आपल्याला सवड नसते!

—पण मी जेव्हां केव्हां लिहिण्याचा म्हणून विचार करितों तेव्हां हे असले अनुभव आणि विचार पाळलेल्या ससाप्रमाणें माझ्या अंवतीं-भंवतीं बागडूं लागतात.

—परवांचीच गोष्ट. गोष्ट लिहावी म्हणून विचार करूं लागलों आणि असल्या छोट्यामोठ्या आठवणींच्या ससांनीं माझ्या मनाभोंवतीं किलबिल सुरू केली!

—आज कांहीं कारणांकरितां घरांत मेथीचीच भाजी आणायला पाहिजे होती. दारावर कांहीं त्या दिवशीं ती आली नाहीं— आणि हातचें काम सोडून मला आतां मंडईत जाणें भाग होतें!

—त्या वेळीं मला कांहीं तरी कल्पना सुचली होती— आणि ती लिहून काढण्याचा मी विचार करीत होतों; पण त्या काव्यकल्पनेला तशीच सोडून यला मेथीची भाजी आणण्याकरितां उठावें लागलें!

—व्यवहारांत काव्यकल्पनेची ही किंमत!

—माझ्या कल्पनेपेक्षां त्या वेळीं मेथीची भाजी श्रेष्ठ ठरली!

लेखकांच्या भोंवतालचें हें परिस्थितीचें जाळें पाहिलें कीं वाटतें, पिढीजात श्रीमंत आणि संस्थानिक यांखेरीज काव्यलेखनाच्या बाबतींत कोणीच पडूं नये!

—पण छट! ही कल्पनाच फक्त चांगली आहे! कारण ते फक्त श्रीमंत आहेत म्हणूनच लिहायला लागले तर काय भयंकर लिहितील!

—पण सामान्य जनस्थितीचीं चित्रें रेखाटण्याकरितां आणि त्यांच्या आयुष्यावर सहानुभूतीची आणि आनंदाची फुंकर मारण्याकरितां त्यांचें जीवन कंठणारेच लेखक पाहिजेत.

— जोडा कुठें लागतो हें जोडा वापरणारानेंच सांगायला पाहिजे!

—आणि लेखकाच्या जीवनविषयक विचारांची आणि तत्त्वज्ञानाची बैठक जर चांगली असेल, तर भोंवतालच्या वाटेल तसल्या परिस्थितींत आणि पेचांत तो किती हेवा वाटण्याइतका सुखी असतो, हें मला माहीत आहे!

स्वतःचें संस्थान नसलेला तो एक संस्थानिक असतो!

—आणि प्रत्यक्ष गरीबीपेक्षां आपल्या गरीबीची जगाकडून होणारी जाणीवच जास्त बोचक असते! —तितकी प्रत्यक्ष गरीबीहि नसते!

पण त्याच्यावर एक मोठें हत्यार आहे!

—तुच्छता!

अगदीं साधें पण भयंकर परिणामी!

समजा, तुम्हांला तुमच्या कामाचा मोबदला म्हणून एखाद्यानें मगरूरीनें तुमच्या अंगावर एक हजार रुपयांचा चेक टाकला; आणि तुम्ही तो तितक्याच शांतपणानें आणि स्थिर-चित्तानें "साभार परत!" केला– तुम्ही एका तोंडानें जेवढा निषेध आणि तुच्छता दाखविणार नाहीं तेवढें त्या हजार रुपयांतले—हजार रुपये—त्याच्या अधेल्या, पावल्या, चवल्या, पै, पैसे दश-सहस्र मुखांनीं तुमचें एकट्याचें काम करतील!

पैशानें माणसें विकत घेतां येतात हा व्यवहारी जगांत यशस्वी ठरलेला एक पोरकट सिद्धान्त— आपल्या किती तरी फायद्याचा असतो! मनुष्य ह्या सिद्धान्ताच्या मदानें गाफील असतो आणि त्या गाफीलपणांत त्याच्या माकडचेष्टा उतास चालल्या, कीं आपल्याला त्याचा कान धरून सांगतां येतें, कीं "बाबा रे, तुझा तो मगरूर पैसा माझ्या जोड्यांतल्या खड्यासारखा मला बोचतो आहे! पैशानें तूं मला विकत घेऊं शकत नाहींस! पैशाचें एकच नाणें तुला माहीत आहे. दुसरें एक नाणें 'माणुसकी' या नांवाचें आहे. आम्ही त्याच्यावरहि जगूं शकतों!"

—हें मीं किंचित् अतिशयोक्तीच्या भाषेंत सांगितलें. कारण हजार रुपयांचे चेक आणि व्यवहार–आपल्यासारख्या सामान्यांच्या आयुष्यांत येतच नाहींत!

—पण रक्कम लहानमोठी कशीहि असो– माणुसकीला मारणारा मगरूर-

पणा जर त्याच्या पाठीमागें आला, तर तेथें तुच्छता दाखविणारा पराक्रमी क्षण—आयुष्यांतल्या अतीव आनंदाची एक लहर आहे!

—आणि ती सामान्य परिस्थितींतल्या माणसांनाच अनुभवायला सापडते म्हणून मला माझ्या सामान्य आयुष्याची लज्जत फार वाटते!

—अर्थात् एखाद्या वेळीं चीडहि येते.

—केव्हां?

काव्यकल्पना लिहायच्या वेळेला मेथीची भाजी आणण्याकरितां बाहेर पडावें लागलें तर! पण परिस्थितीवर स्वार होण्याची माझी नेहमींच तयारी असते!

मी त्या प्रसंगांतच 'लेखन' पाहूं लागतों!

--आणि तिथें छोटे-मोठे योगायोग मला हमखास साह्य करतात!

आतां त्या दिवसाचेंच पाहा ना! मी मारे कोट-टोपी घालून, हातांत मंडईची पिशवी घेऊन, पायांतल्या वहाणा फडफडावीत बाहेर पडणार तोंच—

"भाजी मेथी ऽ ची ऽ ऽ" ही आरोळी माझ्या कानांवर आली.

—आणि एक सरासरी पंचवीस वर्षांच्या उमरीची बाई-- मेथीच्या भाजीची पाटी डोक्यावर— पाठीवर एक धोतराची झोळी अडकविलेली— तींत एक मूल— पायांत करकरणाऱ्या वहाणा— कपाळाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत एक कुंकवाची आडवी रेघ आणि मनांतल्या मनांतील कांहीं सांसारिक कल्पना-तरंगांशीं खेळत-- आपल्या तालामालांत गुंग असलेली माझ्या घरावरून जाऊं लागली!

मीं तिला हाक मारली.

—तिनें आपली भाजीची पाटी उतरून माझ्यापुढें ठेविली.

—पाटींतल्या त्या हिरव्यागार आणि कोवळ्या मेथीच्या जुड्यांनीं माझे नेत्र आकर्षिले गेले. त्या पाटीवर नुकत्याच उगवलेल्या सूर्याचे कोवळे किरण पडले होते; त्यामुळें त्या मेथीच्या कांहीं पानांना पारदर्शकपणा आला होता!

एखादा गालिचा पाहत क्षणभर तटस्थतेनें उभें राहावें त्याप्रमाणें त्या पिवळटसर हिरव्या जुड्यांनीं माझें लक्ष वेधून घेतलें होतें.

" बाई, कशी दिली मेथी ?" माझा आवाज थोडा मृदु झाला.

" एक पैशाला गड्डी, दादा !" तिनें आपल्या पाठीवरचें पोर सावरीत उत्तर दिलें.

" टाक एक-दोन गड्डया—" मीं सांगितलें.

तिनें पाटींतल्या दोन गड्डया माझ्यापुढें टाकल्या. मीं तिला अर्धा आणा दिला. तिची ती 'भवानी' होती वाटतें. तिनें ते दोन पैसे पाटीवर आपटून नंतर दातांनीं चावून उगवत्या सूर्यनारायणाला दाखविले आणि आपल्या कमरेच्या पिशवींत टाकले.

मी तिच्याकडे पाहतच राहिलों. इतक्यांत तिचें पोर रडूं लागलें. त्याला एका हातानें सावरीत तिनें पाटी उचलण्याचा प्रयत्न करीत माझ्याकडे संकोचल्यासारखें पाहिलें. मीं तिची पाटी उचलून तिच्या डोक्यावर दिली.

डोक्यावरची पाटी आणि पाठीवरचें पोर यांचा ताल धरीत, ती " भाजी मेथीऽचीऽऽ" या आरोळीनें पुन्हा चालूं लागली.

माझें दारांतच काम झालें या आनंदानें मीं त्या गड्डया उचलल्या आणि घरांत नेऊन टाकल्या आणि सहज म्हटलें, " मेथीची भाजी अगदीं कोवळी आहे नाहीं ?"

" हं, कशा घेतल्या ?"

" दोन पैशांच्या दोन !"

" मागितल्या असत्या तर दोन पैशाला तीन सहज मिळाल्या असत्या !"

— गोष्ट खरीहि होती आणि कदाचित् अनुभवानें खोटीहि ठरली असती ! पण त्या वेळेला घरांतल्या एकंदर बोलण्याचा सारांश असा निघाला कीं, मला व्यवहारज्ञान अजीबात नाहीं !

— तें ऐकून मला भयंकर राग आला !

—याला कारण म्हणजे मी स्वतःला व्यवहारज्ञानी समजत होतों असें अजीबात नाहीं. माझी तक्रार होती ती याबद्दल, कीं ती गोष्ट मला किती तरी वर्षे पुनः पुन्हा सांगितली जात आहे !

मी व्यवहारज्ञानी नाहीं हें माझें मलाच कबूल आहे मुळीं ! आणि त्यामुळें कित्येक व्यवहारांतून मीं आपलें अंगहि काढून घेतों.

* * *

—कारण माझा दोष मला माहीत आहे! कित्येक व्यवहारांच्या वेळीं माझ्या त्या वेळच्या भावना त्यांच्यांत मिसळतात!

—आणि भावना आणि व्यवहार?

—उत्तर?

—व्यवहारशून्य!

—पण हें कबूल करण्यांत मला कमीपणा कधींच वाटत नाहीं!

—तो माझा स्वभावदोष आतां माझ्या आवांक्याच्या बाहेर गेला आहे.

—माझें काय होतें! इतर मोठमोठ्या व्यवहारांतले तर सोडून द्याच; पण मंडईंत केळीं घ्यायला गेलों, पेरू कसे दिले म्हणून विचारूं लागलों; किंवा भाजीपाला घ्यायला गेलों; कीं त्यांनीं सांगितलेल्या भावांत कमी-अधिक म्हणायला माझी जीभच रेटत नाहीं मुळीं! माझ्या मनाचा तो कमकुवतपणा आहे!

—आणि आतां पुन्हा मी अव्यवहारी आहे हें ऐकलें. मला वाईट वाटलें. माझ्या मनापुढें त्या मेथीवाल्या बाईचें चित्र उभें राहिलें! तिच्या पाठीवरचें तें पोर आजारी होतें, रडवें होतें—वगैरे मला हळवेपणानें सांगायचें नाहीं!

—त्या मेथीवालीच्या पाटींत किती गड्डया असतील?

—फार फार तर पंचवीस किंवा तीस! तिला माझ्यासारखींच सर्व अव्यवहारी माणसें भेटलीं तर त्या तीस गड्डयांचे तिला तीस पैसे मिळणार!

—ती मेथीवाली अत्यंत लबाड आहे असें गृहीत धरलें, आणि समजा, ती लोकांचे पैसे बुडविते असेंहि गृहीत धरलें आणि ते साडेसात आणे तिनें सगळेच्या सगळे लांबवले!

—तिच्या पाठीशीं पोर आहे— अर्थात् घरींहि कांहीं असतील!

—आणि तिच्या कपाळीं कुंकू आहे हेंहि मी विसरत नाहीं; पण त्या सगळ्या मिळकतीचा गुणाकार-भागाकार केला, थंडीवाऱ्यांकरितां लागणाऱ्या चिंधोट्या बाहेर काढल्या, तर खालीं त्यांच्या पोटाला काय राहतें!

रोजीं दोन आणे!

—रोज माणशीं दोन आणे!

हें काय जीवन आहे ?

जगणें आहे ?

—आणि त्यांतहि आपणच एखाद्याच्या तोंडांत मारून वर सहानुभूतीनें त्याचा गाल आपणच चोळीत बसावें त्याप्रमाणें—दुष्ट संभावितपणानें आपण त्यांना समजावून सांगणार:—त्यांच्या जीवनांत स्वच्छता कमी असते—लहान मुलांना पोटभर दूध मिळत नाहीं— त्यांच्या बाळंतपणाच्या खोल्या अंधेऱ्या असतात! कसलें बाळंतपण! अशा आयुष्यांत त्यांतील पुरुषाबायकांचें—दोघांचेंहि नेहमीं बाळंतपणच चाललेलें असतें—म्हणजे काय, फक्त वेदना! आणि या वेदनांचा शेवट– जीवनाचा दिवा मालविण्यांत होतो—तीच त्यांची प्रसूति!

असे विचार माझ्या मनांत येतात आणि मग पैशाला एक गड्डी तिनें सांगितल्यानंतर जास्त मागायला माझी जीभच रेटत नाहीं! माझ्या अंतःकरणाचा, विचारांचा तो कमकुवतपणा आहे!

—आणि हें सर्व मला जास्त केव्हां डाचतें ?

—जेव्हां मी एखाद्या दुकानांत बसलेला असतों, तिथें कोणी तरी माझ्या सारखेंच येतें. तो "अफगाण स्नो" मागतो. दुकानदार बारा आणे किंवा असेल ती किंमत सांगतो. अफगाण स्नोची बाटली बघतच गिऱ्हाइकाची नजर वर जाते– त्याला तिथें Fixed Rate किंवा "एकच भाव" अशी पाटी दिसते. गिऱ्हाईक त्याच्यावर विश्वास ठेवतें; आणि आणा अर्धा आणासुद्धां कमी कर अशी भाषा न काढतां खिशांतील वेळीं मोडसुद्धां तशीच ठेवून, बारा आणे म्हणजे कोण्या झाडाचा पाला– असें मुद्दाम दाखविण्याकरितांहि असेल कदाचित्—खिशांतील रुपया कांढून काचेच्या कपाटावर खळकन वाजवतें—

—मला वाटतें 'हें' काय आहे ?

—आणि नंतर वाटतें 'तें' काय आहे ?

—अफगाण स्नोवांचून माणूस जगणार नाहीं का? मेथीच्या किंवा कोणत्याही भाजीपेक्षां तो जीवनाला जास्त आवश्यक आहे का?

—अफगाण स्नोबद्दलच नव्हे— कोणत्याहि जीवनाला आवश्यक नसलेल्या गोष्टीविषयीं माझी तक्रार आहे ही !

—आणि असल्या गोष्टींचे भाव कमीअधिक विचारण्यांत शिष्टाचाराला सोडून होतें.

आणि मेथीची भाजी सांगितलेल्या भावानें घेतली तर मनुष्य अव्यवहारी ठरतो !

—असें कां असावें ? वास्तविक असें असूं नये !

—असें असूं नये हें खरें—आणि तसें आहे हेंहि तितकेंच खरें आहे !

—आणि मला आतां इतक्या दिवसांच्या अनुभवानें ठाऊक झालें आहे, कीं आजूबाजूला विचार सांगत बसणें म्हणजे वादविवाद आणि विनोद पिकविणें आहे ! त्याच्यावर फक्त मतभेदाचा फुलोरा येतो, कृतीचें फळ त्याला कधींच लाभत नाहीं. अलीकडच्या विचारांचें नैसर्गिकच 'संतति-नियमन' झालें आहे कीं काय परमेश्वराला माहीत !

—पण मी मात्र एक करतों; कोणी मला व्यवहारी म्हणो, अव्यवहारी म्हणो; भाजीपाला, फळफळावळ यांच्या किमतीशीं 'कमीअधिक' करीत मी कधींच बसत नाहीं !

—कारण मनुष्य करीत असलेल्या धंद्यावर त्याचें आयुष्य कितपत पोसलें जातें याची कल्पना झटकन् माझ्या मनांत रंगते, मनांत करुणा पालवते आणि त्यामुळें भावनेनें ओथंबलेला मी व्यवहार पाहूंच शकत नाहीं !

# बरणींतला नाग आणि बिळांतले नाग : ३

पुरंदरे मास्तर म्हणून माझे एक स्नेही आहेत. त्यांच्याकडे मी केव्हां तरी गप्पा मारायला जात असतों. एक दिवस मी त्यांच्याकडे गेलों असतांना मला एक मजेदार प्रसंग पाहायला मिळाला.

एका मोठ्या थोरल्या काचेच्या बरणींत एक सरासरी सहा फूट लांबीचा नाग स्पिरिटमध्यें घालून ठेवलेला होता. आणि पुरंदरे मास्तरांकडील मुलें त्या नागाकडे कुतूहलानें पाहत बसलीं होतीं!

—तो नाग त्यांच्या घरांत आज किती तरी दिवस वावरत होता. घरांतील सर्व माणसांनीं त्या नागाची भीति घेतली होती.

आज तो नाग मारला गेला होता आणि त्या मेलेल्या नागाला 'स्पिरिट'-च्या बरणींत घालून ठेवून, पुरंदरे मास्तरनीं त्या नागाचा 'इतिहास' करून टाकला होता!

—मीं कुतूहलानें त्या बरणींतल्या नागाकडे पाहिलें. जिवंत नाग पोहणीला पडल्यासारखाच तो सतेज दिसत होता. अजूनहि त्याच्या डोळ्यांची टक कांहीं तरी पाहत आहे असें मला वाटत होतें! त्या नागाची मेलेली दहशत अजूनहि माझ्या मनाला भुरळ घालीत होती!

—आणि त्या घरांतल्या मुलांलेकरांचा आनंद तर त्या नागाकडे पाहून एकसारखा उसळत होता. त्यांतील कित्येकांनीं हातांत कडब्याचीं ताटें घेतलीं होतीं; आणि पूर्वीं भरतानें ज्याप्रमाणें सिंहाच्या छाव्याचे दात मोजले म्हणतात, त्याप्रमाणें तीं मुलें कडब्याच्या काटकीनें त्या नागाचे दात, जिभल्या वगैरे एकमेकांना दाखवीत होतीं.

वेळ सकाळीं दहा-साडेदहाची होती. अंगणांतले ऊन हळूहळू घरांत घुसत होतें. आणि एका खिडकीवाटे त्या बरणीवरहि नेमकें ऊन पडलें होतें. त्यामुळें तें दृश्य आणखी जास्त तजेलदार दिसूं लागलें.

इतक्यांत एक मुलगा म्हणाला, "अरे, हा नाग असा पळाला म्हणून सापडला. तो जर तसा गेला असता तर आपल्या हातांतून खास निसटला असता!"

आणि या म्हणण्यावर सर्व मुलांनीं माना डोलविल्या.

आणि त्या वाक्यानें मला मात्र हसूं आलें. "अमकें झालें नसतें तर इतिहास पालटला असता!" असें कित्येक विद्वान् कांहीं ऐतिहासिक घटनांविषयीं लिहितांना आपण वाचतों त्या धर्तीचें वाक्य वाटलें मला तें!

—ज्याची परिस्थिति त्याला माहीत!

—पण विद्वानांचे तर्कवितर्क चाललेलेच असतात! बुद्धीला चालना देण्याच्या दृष्टीनें असे तर्क ठीकहि असतील कदाचित्— पण त्यांत इतिहासाला शहाणपणा शिकविण्याचा जो अभिनिवेश असतो तो बालिश वाटत नाहीं का?

मेलेल्या नागाची चूक काढतांना त्या मुलांच्या हातांत कडब्याच्या काड्या होत्या आणि तसें लिहितांना विद्वानांच्या हातांत लेखण्या असतात, येवढाच फरक!

"काय रे, आतां आमच्या घरीं रात्रींचा यायला नाहीं ना भिणार तूं? आतां काय नाग मेला!" कुणी तरी विचारलें!

एक—त्या मुलांना दिसलेला नाग मेल्यामुळें त्या मुलांना झालेला आनंद— अजाण आनंद! एक— नाग मारल्या गेल्यामुळें एकंदर नाग-जातीबद्दल मुलांची तुच्छतादर्शक निर्भयता!

या ठिकाणीं मला एक गमतीदार गोष्ट आठवते आहे. इंग्लंडचे राजे पांचवे जॉर्ज जेव्हां अत्यवस्थ होते तेव्हां एक खेड्यांतील एका चांगला वयस्क माणूस माझ्याकडे आला होता. आमच्या सहज कांहीं तरी गप्पा चालल्या होत्या. इतक्यांत तो आवेशानें म्हणाला, "आम्हांला तुम्ही खेडवळ म्हणतां—पण तुम्हां शहरी लोकांना तरी योग्य संधि साधण्याचं कुठं अवधान असतं." तो बोलत होता अन् मी ऐकत होतों. त्यानें एकदां कावरे-बावरेपणानें सभोंवार पाहिलें आणि अगदीं हलकेच मला म्हणाला, "येवढ्या तुमच्या राजकीय चळवळी चालू आहेत— पण आतां कशी अगदीं योग्य संधि आहे! राजेसाहेब अगदीं अत्यवस्थ आहेत, आतां सगळे अस्वस्थ असतील, तेव्हां ही वेळ खरी घाई करण्याची आहे. या वेळीं आपलं राज्य कसं पटकन् परत आपल्या हातीं येईल!"

मी गंभीरपणें ऐकण्याचा आव आणीत होतों. पण शेवटीं माझें हसणें मला आवरलें नाहींच; आणि आतां मुलांना दिसलेला एक नाग मेल्यामुळें त्यांना झालेला अजाण आनंद पाहूनहि मला हसूं येऊं लागलें!

—पण बोलून-चालून लहान मुलेंच होतीं तीं!

—त्यांच्या हें कसें लक्षांत येणार, कीं हा नाग कांहीं एकटा आकाशांतून खालीं पडलेला नव्हता! त्याचे आप्त, सगेसोयरे, आईबाप— किंवा मुलेंलेंकरें सर्व कांहीं विलायतेला शिक्षणाकरितां रवाना होऊन हाच फक्त इकडे हिंदुस्थानांत त्यांच्याकरितां झुरत बसला नव्हता!

—बरणींतला नाग बघून तीं मुलें हसत होतीं— निर्धास्त होतीं. पण त्यामुळें बिळांत वावरणारे नाग कांहीं हतबल झालेले नव्हते! या नागाचें मरण कदाचित् अद्याप त्यांना कळलें नसेल म्हणून फार तर ते सूडाचे फूत्कार सोडीत नसतील; पण—

—नागांना जर बुद्धि असेल तर माणसांप्रमाणेंच तेहि आपली कुलवाढ आणि आपल्या वंशाचा उत्कर्ष इच्छीत नसतील काय? आणि जर त्यांना

बुद्धि नसेल आणि फक्त भावना असेल– तर भावनेच्या हालचालीनें ते आपलीं मुलेंलेंकरें कुठें आहेत, काय करीत आहेत, कुणाची लांबी किती वाढली आहे— आपली प्रियकरीण कुठें आहे—किंवा आपला प्रियकर कुठें आहे—

—पण बिळांतल्या नागाचें अस्तित्व त्या मुलांच्या कुठें हिशेबांत होतें ?

—आणि पुष्कळ वेळेला आपणहि अशी चूक करीत नाहीं का ? आपल्या आयुष्यांतील एखादा प्रतिस्पर्धी किंवा अडचण नाहींशी झाली, कीं आपणांला 'कृतकृत्य' झाल्यासारखें वाटतें ! आणि असें आपल्याला वाटूं लागलें कीं समजावें– आपल्या आयुष्याचा नाग इतिहासाच्या बरणींत जाऊन पडला म्हणून !

—मग त्या बरणींतल्या नागाचें जसें प्रदर्शन तसें आपल्या राहिलेल्या आयुष्याचें नुसतें प्रदर्शन ठरतें !

आणि आतां कागदावर लिहितों आहे म्हणून का होईना, पण मला असें वाटतें, कीं नाग, साप, वाघ, सिंह त्यांच्या खऱ्या स्वरूपांत जर आपल्याला भेटले— पण आपलें आयुष्य नागर झाल्यामुळें तें फारसें शक्य नाहीं ! किंवा त्या प्राण्यांच्या वृत्ति असलेले, त्यांचे मानवी वंशज आपल्याभोंवतीं जर वावरूं लागले, तर मला त्यांची भीति किंवा दहशत कधीं वाटली नाहीं आणि बहुधा कधीं वाटणारहि नाहीं !

—तर उलट त्यांचें आपल्याभोंवतींचें अस्तित्व– आणि सुदैवानें माझ्या-भोंवतीं तें फारसें नाहीं—मला माझ्या आयुष्याचा अलंकार वाटतो.

रस्त्यावरचा तारेचा खांब नीट सरळ उभा राहावा म्हणून जसे त्याला तारांचे ताण दिलेले असतात— तसे हे विरोधाचे आणि वैषम्याचे आपल्या आयुष्याचे ताण आहेत ! खरें बोलायचें झालें तर आपल्या आयुष्याचें वैशिष्ट्य त्यांच्यावर अवलंबून असतें !

—पण हें केव्हां ?

आपण स्वतः सद्भावनेनें ओथंबलेले असूं तर ! नाहीं तर आपल्याच आयुष्याच्या खांबाला गर्वाचा, कुत्सितपणाचा, अहंमन्यतेचा गंज चढलेला असला तर भोंवतालचे हे ताण आपल्याला कधीं लोळण घ्यायला लावतील याचा नेम नसतो.

अशा या नाग-सापांची आपल्याला कधीं दहशत वाटतां कामा नये हें जसें खरें, तसें आपण कधीं त्यांच्याशीं हौसेनें खेळायलाहि जाऊं नये— आणि मार्गांत आले तर आपला रस्ताहि बदलूं नये!

असुक एक गोष्ट—चांगली किंवा वाईट—जगांतून अजिबात नाहींशी होणें कधींच शक्य नाहीं! येवढें जनमेजय राजानें सर्पसत्र केलें म्हणून ती सर्प-सृष्टि नाहींशी झाली काय?— किंवा उद्यां सर्व सापांनीं आणि नागांनीं एकमत करून मनुष्य-सृष्टीला दंश करीत सुटायचें म्हटलें तरी मनुष्यसृष्टि ही नाहींशी होणें शक्य नाहीं!

पण कांहीं माणसें आपल्या जीवनाची सर्कस करीत असतात! अंगांत रग आहे म्हणून ते पुंगी वाजवून— बिळांतले साप बाहेर काढीत बसतात; हातीं लागला तर त्याचे दात पाडतात— आणि परडींत घालून त्याच्यावर पोट भरतात! पण ही केवळ आयुष्याची सर्कस झाली! हें कांहीं जगणें नव्हे!

असे बिळांतून पुंगी वाजवून साप बाहेर काढतांना कधीं साप हातीं लागतो, तर कधीं मनुष्य मृत्युमुखीं पडतो!

माझ्या दृष्टीनें हें केवळ कलेशीं खेळणें आहे, जगणें नव्हे!

आपल्या मार्गांत साप आला तर ठेचावा, पण केवळ साप आहे आणि माणूस आहे म्हणून एकमेकांनीं एकमेकांवर दात धरण्यांत काय अर्थ?

मुलांचें त्या सापाभोंवतीं बागडणें चाललें होतें आणि मी मनांतल्या मनांत वरील विचारांशीं बागडत होतों!

इतक्यांत खुद्द पुरंदरे मास्तरच तिथें आले.

"काय, चहा घेणार ना?" मास्तरनीं मला हसत हसत विचारलें.

"नको—" मी एक उसासा टाकीत म्हणालों.

"म्हणजे काय! आज चहा दिल्याशिवाय आम्ही नाहीं तुम्हांला सोडणार!" मास्तर आग्रही स्वरांत म्हणाले.

"कां, आज विशेष काय आहे?"

"आज आम्हीं हा नाग मारला आहे म्हणून!" आणि पुरंदरे मास्तर हसत हसत त्या सापाकडे पांहत म्हणाले, "पहा बेटा आतां कसा बसला

आहे तो! बेट्यानं आज आठ-पंधरा दिवस आम्हांला सुखानं झोप येऊं दिली नव्हती—" आणि त्याच्यापुढें मास्तरनीं त्या नागाला एक शिवी हासडली.

वास्तविक पुरंदरे मास्तरांचा एकंदर स्वभावच फटकळ असल्यामुळें त्यांच्या शिवीला आतांच काय, पण केव्हांच अर्थ नसे. कारण तोंडानें ते जरी फटकळ होते तरी अंतःकरणानें प्रेमळ होते.

पण हें मला माहीत असूनहि त्या वेळीं त्या मेलेल्या नागाला त्यांनीं हासडलेली शिवी मला आवडली नाहीं.

मी माझ्या गंभीरपणाच्या लहरींत आलों होतों!

मीं म्हटलें, "मास्तर, जसे दहा-पंधरा दिवस तुम्हीं बेचैन झाला होतात तसा तोहि कशावरून बेचैन झाला नसेल? तुम्ही यशस्वी झालात–तो प्राणाला मुकला? तुमचं काम झालं, त्याचं कांहीं कामच राहिलं नाहीं! वैराचा अशा तऱ्हेनं शेवट झाल्यानंतर– मला वाटतं वैऱ्यालासुद्धां पहिल्यांदा आनंदानं आणि आदरानं नमस्कारच्च करावा!"

पुरंदरे मास्तरहि एकदम गंभीर झाले आणि खरोखरच त्यांनीं त्या मेलेल्या नागाला हात जोडले; आणि जरा वेळानें खालीं बसत माझ्या मांडीवर थाप मारीत म्हणाले, "बरं, आतां तरी चहा घेऊन जाणार का?– पण चहा नाग मारल्याबद्दलचा नव्हे! बरेच दिवसांनीं माझ्या घरीं आलांत म्हणून!"

मग मलाहि नाहीं म्हणवेना.

अखेर मीं चहा घेतला आणि कांहीं तरी उदात्तपणाकडे झुकणाऱ्या विचार-तंद्रींत मी तेथून बाहेर पडलों.

तो दिवस माझा कसा तरीच्च गेला. त्या दिवशीं रात्रीं मी सहज अंगणांत खुर्ची टाकून बसलों होतों. रात्र अंधारी होती. वर आकाशाकडे नजर जातांच आकाशगंगेचा पट्टा मला दिसला. मला वाटलें या आकाश-गंगेतून किती तरी तारे निखळून पडत असतील, किती तरी नवीनहि निर्माण होत असतील! पण आपल्याला कधीं आकाशगंगेत कमी अधिकपणा दिसतो का?

—तसेंच जीवनाच्या गंगेचें! त्यांत कितीक नाग-साप मरत असतील—माणसें मरत असतील; पण जीवनाचा ओघ अखंड चाललेला आहे!

तेव्हां माणसांनीं आपलें वैर आपल्याबरोबर संपवावें आणि वैराशीं खेळतहि बसूं नये !

बरणींत गेलेले साप—हा इतिहासकाळ; त्यावरून धडे घ्यावे पण पिढीजात वैर माजवूं नये. वावरणारे साप—हा वर्तमानकाळ; त्यांच्याशीं प्रसंगीं झुंझावें—पण वेळ आहे, सवड आहे किंवा नांव व्हावें म्हणून बिळांतून हात घालून नाग बाहेर काढूं नयेत.— बिळांत वावरणारे नाग-साप—हा भविष्यकाळ आहे; आणि आपण त्यांना बाहेर ओढून काढण्याचें वास्तविक कांहींच कारण नाहीं. कारण केव्हां तरी ते बाहेर येणारच आहेत !

—आणि सरपटणाऱ्या सापाशीं आपला क्वचित्‌च संबंध येतो— आपल्या-भोंवतीं निराळेच साप वावरत असतात !

—आणि त्यांना तरी साप म्हणून हिणविण्याचें आपल्याला काय कारण? आपण माणसं— स्वतःला चांगलीं समजणारीं आपण माणसं तरी कुठें निर्विष असतों ?

—मला अनुभव नाहीं, पण असें म्हणतात, कीं आपण रात्रीं तोंडांत तांदळाचे दाणे धरून झोपलों— आणि सकाळीं ते दाणे जर अंगणांत चिमण्यांना टाकले—

—आणि चिमण्यांनीं जर ते अजाणतां खाल्ले— तर चिमण्या मरून पडतात असें म्हणतात !

ही आपल्यासारख्या चांगल्या माणसांची गोष्ट— मग सापांना आणि नागांना विषारी म्हणून हिणविण्यांत काय हशील ?

---

# एक सज्जन : : ४

आमच्या अण्णासाहेबांचें वय आज जवळजवळ सत्तरीच्या घरांत होतें. त्यांची माझी ओळख जवळजवळ गेल्या दहा-पंधरा वर्षांची. आणि गेल्या एक-दोन वर्षांत त्यांचें माझें कांहीं नातेंहि निर्माण झालें होतें. माझ्या मामेभावाच्या चुलतभावाला त्यांच्या मावसबहिणीची पुतणी दिलेली होती. अण्णासाहेबांचा माझ्यावर पूर्वीपासून लोभ होताच, तो या नात्यानें आणखी दुणावला !

अण्णासाहेबांच्याबद्दल सगळ्यांचें मत चांगलें होतें. त्यांचा निंदक शोधून-हि सापडला नसता ! आणि यदाकदाचित् चुकून सापडला असता तरी अण्णासाहेबांनीं त्याची ती निंदा आत्मगौरव ऐकल्यासारखी ऐकून घेतली असती, कीं तो निंदकच अखेर शेवटीं कंटाळून व लाजून अण्णासाहेबांचा स्तुतिपाठक बनला असता !

* * *

गेल्या दहापंधरा वर्षांच्या अण्णासाहेबांच्या अन् माझ्या स्नेहसंबधांत अण्णासाहेबांच्या तोंडून कोणाबद्दलहि मीं एकसुद्धां टीकेचा व निंदेचा शब्द ऐकला नव्हता ! जवळजवळ अण्णासाहेब म्हणजे स्तुतीचें आणि गोड शब्दांचें कल्पवृक्षाचें झाडच होतें म्हणा ना ? कोणीहि यावें आणि आपली स्तुति ऐकून जावें !

ते नेहमीं वरवर बोलायचे ! एखादा विद्यार्थी भेटला कीं, " काय, या वर्षीं पहिल्या वर्षांत पास होणार ना ? अहो श्रमांचं केव्हांहि चीज होणारच ! आम्हांला पेढे द्यायला मात्र विसरूं नका हं ! " थोडक्यांत म्हणजे विद्यार्थी म्हटले कीं पहिला वर्ग, सौभाग्याकांक्षिणी दिसली कीं, " काय, एखादा आय. सी. एस्. पटकावणार ना ? " नोकरपेशांतला माणूस भेटला कीं प्रमोशन, देशभक्त दिसला कीं अध्यक्ष— असें चालायचें ! झाड कसलं आहे तें फक्त अण्णासाहेब पाहत, मग तें कितीहि लहान व खुरटं जरी असलं, तरी अण्णा-साहेब त्या जातीचीं फुलं आणून त्या झाडावर टाकीत, कीं त्या झाडांना वाटावं— किती लवकर आपल्याला फुलं आलीं !

—इतका परगौरवपर त्यांचा स्वभाव असल्यामुळें त्यांच्याबद्दल वाईट मत कोणाचें आणि काय म्हणून व्हावें ?

* * *

बरं, ते घरचे इतके सधन होते, कीं कोणी जरी त्यांना थोडीशी पैशा-अडक्याची तोषीस दिली, तरी त्यांच्या परिस्थितीला ती कधींच जाणवत नव्हती. त्यांची इस्टेट व उत्पन्न इतकें जिवंत होतें, कीं चार-सहा दिवसांनीं आपण जशी दाढी करून आपला चेहरा तुळतुळीत करतों त्याप्रमाणें अण्णा-साहेबांना अशी पैशाअडक्याची लागलेली तोषीस म्हणजे केवळ दाढी केल्या-सारखें वाटे ! त्यामुळें त्यांचा स्वभाव आणि सज्जनपणा जास्त तुळतुळीत दिसूं लागे !

—पण एका प्रसंगानें माझ्या मात्र मनानें घेतलें, कीं अण्णासाहेब वरवर जरी असे समाधानी आणि साधु दिसत होते, तरी या घड्याला कुठें तरी छिद्र आहे ! या कल्पवृक्षाला कुठें तरी कीड लागलेली आहे खास ! आणि कल्पवृक्ष झाला तरी त्याचें त्याला स्वतःला काय ? दुसऱ्याच्या इच्छा, आशा त्यानें तृप्त करायच्या आणि स्वतः मात्र नुसतें झाडच राह्यचें !

वर सांगितलेंच आहे, कीं माझ्या मामेभावाच्या चुलतभावाला अण्णासाहेबांच्या मावसबहिणीची पुतणी दिलेली होती म्हणून! तो माझ्या मामेभावाचा चुलतभाऊ दिसायला जरी देखणा असे, आणि बोलण्याचालण्यांतहि विद्वान् वाटत असे, तरी तो वृत्तीनें बराच कलावंत असल्यामुळें एखाद्यानें आपली मुलगी देऊन नातें जोडण्याइतका लायकीचा खास नव्हता! आणि अण्णासाहेबांनाहि हें पूर्ण माहीत होतें. पण अण्णासाहेबांच्या नातलगानें त्या मुलाबद्दल चौकशी करतांच, अण्णासाहेब उद्गारले, "मुलगा तसा चांगला आहे. असें स्थळ शोधून मिळायचें नाहीं. माझी मुलगी लग्नाची असती, तर मीं त्याला खात्रीनें दिली असती!" हें त्यांचें विनाकारण चांगलें बोलणें मला बिलकुल आवडलें नाहीं. माझ्या मामेभावाचा चुलतभाऊ माझ्याबद्दल वैषम्य बाळगून असल्यामुळें मला त्या लग्नप्रसंगांत कांहींच स्थान नव्हतें!

— आणि अण्णासाहेबांचा योग असा होता, कीं हे त्यांचें विनाकारण चांगलें बोलणें त्यांना आतांपर्यंत कधींच बाधलें नव्हतें!

— कांहीं माणसें अशींहि असत नाहींत का, कीं ज्यांना विंचवाचें विष कधीं चढत नाहीं; किंवा अशींहि कांहीं माणसें असतात, कीं ज्यांच्या अंगांवर बिब्बा कधीं उतत नाहीं!

— आणि त्यामुळें माझा माल अण्णासाहेबांच्याबद्दलचा ग्रह अजीबात बदलला. मला वाटूं लागलें, कीं अण्णासाहेब हाडाचे सज्जन नसावेत; तर सज्जन ठरण्याचें किंवा स्वतःला सज्जन म्हणवून घेण्याचें त्यांना व्यसन लागलेलें असावें!

— अण्णासाहेब प्रत्येकाची स्तुति किती करीत? अगदीं मनमुराद! त्यांनीं केलेल्या कित्येकांच्या कित्येक स्तुत्या मीं ऐकल्या आहेत. प्रत्येक स्तुतीचें तात्पर्य आपलें हें निघे—

"**झाले बहु, होतिल बहु, आहेतहि बहु परंतु यासम हा!!**"

आणि त्यामुळें माझी खात्री झाली, कीं अण्णासाहेबांचा सज्जनपणा वरपांगी आहे आणि स्वतःच्या स्तुतीचें आणि सज्जनपणाच्या लौकिकाचें पीक भरपूर काढण्याकरितां दुसऱ्यांना त्यांच्या स्तुतीचे हे रतीब अण्णासाहेब घालीत असावेत! त्यांना स्वतःला कर्तबगार आयुष्य लाभलेलें नव्हतें.

पिढीजात इस्टेटीच्या फक्त बेरीज-वजाबाक्या करीत बसणें ही काय कर्तब-गारी ? बरें, कलावंत बनण्याइतकें धाडस त्याच्या अंगांत नव्हतें ! मग सज्जन असण्यापलीकडे त्यांना तरी काय करणें शक्य होतें ? ते सज्जन होते हा त्यांचा अगदीं नाइलाज होता !

तुम्ही त्यांना जरी अगदीं काल भेटून गेला असलांत, आणि आज जरी त्यांची-तुमची चुकून गाठ पडली, तरी अण्णासाहेब लगेच बोलण्या-वागण्याचा असा अभिनय करतील, कीं तिऱ्हाइताला वाटेल तुमच्या त्यांच्या भेटीला "राम-भरत" भेटीइतकें महत्त्व आहे आणि तसलेच प्रसंग त्या भेटीमागें आहेत !

रस्त्यांत पडलेल्या शेणाचें आणि लगेच कुणी दाखविलेल्या सोन्याचें ते सारख्याच तन्मयतेनें वर्णन करीत.

त्यांना कांहीं लेखक-मित्रहि होते. त्यांच्या न वाचलेल्या पुस्तकांची अण्णासाहेब इतकी बेहद्द स्तुति करीत, "बाकी तुमच्या अलीकडच्या लेखकांची भाषा म्हणजे—" लगेच ब्रह्मानंद झाल्याइतका आनंद दर्शविण्याकरितां डोळे मिटून ते वाक्य पुरें करायचे— "आनंद आहे !"

* * *

पुस्तक-परीक्षणाच्या बाबतींतच काय पण कोणाच्याहि बाबतींत असें वरवर नुसतें शेवाळें पसरीत राह्यचें ! तपशिलाच्या पाण्याला कधीं स्पर्शच करायचा नाहीं ! ऐकणारा जर भोळसट असला तर त्या शेवाळ्यालाच मखमल समजून त्याचा कोट करण्याचें मनोराज्य त्यानें खुशाल करावें !

पण हें असें चांगलें बोलण्यांत "उगवत्या सूर्याला अर्घ्य" असलें स्वार्थी तत्त्वज्ञानहि नव्हतें ! कारण आजूबाजूच्या "चमकत्या काजव्यांनाच" त्यांचें हें नेहमीं अर्घ्यप्रदान चाले !

—हें सर्व बाहेरच्या जगाशीं झालें.

—आणि खुद्द स्वतःच्या घरीं ?

—जें बाहेर तेंच घरांत !

—किंवा अण्णासाहेब आपल्या घरांत अशा वागण्या-बोलण्याची रंगीत तालीम करीत व मग बाहेर त्याचे "लोकप्रिय प्रयोग" करून दाखवीत !

—जास्त कशाला सांगूं? त्यांच्या अंगावर धावून आलेल्या कुत्र्यालसुद्धां कधीं "हाड ऽ" म्हणून ते उद्धटपणानें म्हणत नसत! कुत्रा त्यांच्या अंगावर धावून आला, कीं अण्णासाहेबांनीं म्हणावें "अलीकडचीं कुत्रींसुद्धां काय धीट! कुत्र्यांची भाषा आपणाला समजत नाहीं म्हणून; पण माझी खात्री आहे, कीं या त्यांच्या भुंकण्यांत आणि धावण्याच्या आविर्भावांत कांहीं तरी तत्त्वज्ञान आहे!" अर्थात् अण्णासाहेबांबरोबर त्या वेळीं कांहीं माणसें असतच. तीं तें कुत्रें हाकून लावीत आणि अण्णासाहेबांचा सज्जनपणा शाबूत तर राहीच; पण त्याला अलौकिकतेची आणखी झिलई चढे!

त्यामुळें अण्णासाहेबांचें नांव कुठेंहि निघालें कीं—

"**सज्जन!**

**सज्जन!!**

**सज्जन!!!**"

—असा जयघोष ऐकूं येई.

* * *

तो सज्जन परवां अचानक अंथरुणाला खिळला; आणि त्यांच्या मनानें विनाकारणच घेतलें, कीं या आजारीपणांत आपला अवतार संपणार म्हणून!

—मीं आपण होऊन त्यांची सेवा-शुश्रूषा पत्करली होती!

—पहिल्या-पहिल्यांदा खूप माणसें त्यांच्या समाचाराला आलीं. पण कांहीं दिवसांनंतर अण्णासाहेबांच्या आजारांतलें नावीन्य नाहींसें झालें; आणि मग माणसें येईनाशीं झालीं.

—मी मात्र रोज नेमानें जात असे.

एक दिवस अण्णासाहेबांच्या प्रकृतीला जरा उतार वाटला. मी कांहीं तरी बोलायला विषय पाहिजे म्हणून सहज म्हटलें, "अण्णासाहेब, आपले विनायकराव आले नाहींत बरेच दिवसांत?"

अण्णासाहेब थोडेसे कावरेबावरे झाले. मुद्दामच त्यांनीं थोडासा खोकला काढला; आणि स्वतःच्या अंगावरचें पांघरूण सावरीत ते मला म्हणाले,

"अरे कसला विनायकराव आणि कसलं काय! कशाला येतील आतां इकडे— मी काय त्याला ओळखून नाहीं असं तुम्हांला वाटतं?"

अण्णासाहेबांच्या या बोलण्यानें मला काय जबरदस्त धक्का बसला म्हणतां ! कारण विनायकराव म्हणजे आण्णासाहेबांच्या जिगर दोस्तांतील मेरुमणि ! त्यांच्याबद्दलच अण्णासाहेबांनीं असें म्हटल्यानंतर--

"अहो, झालीं त्या गोष्टीला आतां दहा-पंधरा वर्षं. हा विनायकराव एकदां माझ्या घरीं आला होता. त्या दिवशीं पोस्ट बंद होतं वाटतं; आणि त्यांना तिकीट पाहिजे होतं. मीं त्याला अर्ध्या आण्याचं तिकीट दिलं— मला वाटलं सुटे पैसे नसतील गृहस्थाजवळ— नसतील दिले त्या वेळीं ! पण त्या अर्ध्या आण्याची गृहस्थाला पुढें कधींच आठवण झाली नाहीं— म्हणजे आजपर्यंत हो— तो विनायकराव समोर आला, कीं मला माझा बुडालेला अर्धा आणा दिसूं लागतो— पण क्षुल्लक गोष्टीकरितां कशाला एखाद्याला दुखवा, म्हणून मी आजपर्यंत गप्प बसलों. झाली त्या गोष्टीला आतां पंधरा वर्षं ! अहो, ही ज्या माणसाची दानत— हा हलकटपणा नव्हे काय ?"

अरे बाप रे ! मी मनांतल्या मनांत ओरडलों ! अण्णासाहेबांसारख्या सज्जन माणसाच्या मनांत बुडालेल्या अर्ध्या आण्याबद्दल ही एवढी जखम !

—आणि नंतर मीं त्याच बैठकीला संधि साधून त्यांच्या एकेक जिवलग दोस्तांचीं नांवें त्यांच्यापुढें करून पाहिलीं; आणि त्यांच्या बोलण्यांत आलें, कीं त्यांच्या प्रत्येक स्नेह्याबद्दल त्यांचें मत डागळलेलें आहे ! आणि तो डागळलेला भाग कधींच चाळवला वा विसरला न गेल्यामुळें अण्णासाहेबांचें मत त्यांच्या प्रत्येक स्नेह्याबद्दल सडलेलें आहे !

पण मग मला एका गोष्टीबद्दल हळहळ वाटूं लागली. इतरांच्याबद्दल अण्णासाहेबांचें मत मला समजलें— पण माझ्याबद्दल ?

—तें कळणें कसें शक्य होतें ? पण मीं मुद्दामच भोळेपणाचा आव आणून त्यांना विचारलें, "अण्णासाहेब, माझ्या हातून असा आपला कांहीं अपराध झाला आहे का ?"

माझा तो प्रश्न ऐकून अण्णासाहेबांना एक केवढा मोठा हुंदका आला आणि त्याच आवेशांत त्यांनीं माझ्या मांडीवर एक आपुलकीची आजारी थाप मारीत म्हटलें, "भाऊसाहेब, तुमच्यासारखा देवमाणूस—"

मला घाम फुटला! अण्णासाहेबांचें सज्जनपणाचें भूत पुन्हा त्यांच्या अंगांत आलेलें मीं ओळखलें. मला आतां तिथें बसवेना. मी उठलों.

पण तितक्यांत अण्णासाहेबांनीं मला एक केविलवाणी हाक मारली आणि म्हटलें, "भाऊसाहेब, पण माझ्याविषयीं आपलं मत ?"

"हलकट, ढोंगी, सज्जनपणाचें सोंग आणणारे बदमाष—" मी येथें एक अर्थपूर्ण आंवढा गिळला आणि वाक्य पुरें केलें "—असे आपले स्नेही आहेत हें मला आज आपल्या तोंडून कळलं—पण इतकें हलाहल पचविणारे आपण केवळ भगवान् चंद्रमौली आहांत!– अण्णासाहेब कसं साधतं तुम्हांला हें ?"

"अयाई ग!" अण्णासाहेबांनीं आजपर्यंत सोसलेल्या कष्टाच्या वेदना दिल्या आणि म्हणाले, "कुणाबद्दल कशाला वाईट बोला आणि आपल्याला उगाच शत्रु निर्माण करा– या संभावित कल्पनेनं आजपर्यंत मीं हें सोसलं—आतां अगदीं असह्य झालं आहे—" अण्णासाहेबांना मळमळूं लागलें आणि केवळ्यांदा तरी त्यांना एक उलटी झाली!

—या अशा माणसाला सज्जन म्हणतां येईल का ?

—एका माणसाबद्दल सगळे चांगले बोलतात, कदाचित् शक्य आहे. पण तो माणूसहि सगळ्यांबद्दल विनाकारण चांगलें बोलत सुटला तर खुशाल समजावें, कीं तो परस्परांवर पोसलेला एक धंदा आहे!

तो एक सामाजिक रोग आहे.

—प्रत्येक माणसाला स्तुति हवी असते हें कोणीहि कबूल करील. पण —ती स्तुति किती असावी ? कळी उमलायला जेवढा वारा लागतो, तेवढी! पण आपण जर कळीवर येवढा वारा सोडला, कीं कळी गळून पडावी आणि स्तुतीच्या वाऱ्याच्या झोतानें गळून गेलेल्या कळीचा फक्त देठ हलत राहावा—

'संपूर्ण अण्णासाहेब' जगांत फारसे दिसत नाहींत; पण अण्णासाहेबांच्या सज्जनपणाचे अर्धेबोबडे तुकडे आजूबाजूला किती तरी दिसतात. शिष्टाचाराच्या नांवाखालीं विनाकारणच एखाद्याची स्तुति करीत बसणें हा एक सामाजिक गुन्हा आहे.

उगीच थोडा कुठें उजेड दिसला, कीं सूर्याला प्रतिस्पर्धी निघाला म्हणून त्या क्षुल्लक उजेडाला चढवीत बसायचें, वाळूंत थोडासा ओलसरपणा दिसला, कीं राजापुरची गंगा इथें उपटणार म्हणून तिथें गर्दी गोळा करीत बसायचें— हा एक चांगल्या वाटणाऱ्या कल्पनेचा समाजावर होणारा अन्याय आहे.

—आणि एकमेकांबद्दल विनाकारणच चांगलें बोलण्याचा रोग जेव्हां 'शिष्टाचार' म्हणून बळावतो तेव्हां बोलायचीहि पंचाईत होऊन बसते. स्पष्ट बोलणें हा त्या राज्यांत 'हेवा-दावा' ठरतो! आपली स्तुतिसुद्धां आपण पारखून घ्यायला शिकायला पाहिजे!

खोटी स्तुति, मग ती जरी आपली असली तरी, ती स्पष्ट निंदेपेक्षांहि जहरी असते, पण उंदरांनीं फसून विषारी गोळी खावी त्याप्रमाणें ती स्तुतीची विषारी गोळी आपण खातों!

—आपली आवड-नावड स्पष्ट बोलून दाखविणारा माणूस मला आवडतो. एखादें मत आपल्याला पटत नसेल; आणि तिथें आपला मतभेद दाखविण्याचें जर आपल्याला धाडस नसेल, तर माणसानें फार तर गप्प बसावें. पण तिथेंहि 'हात वर' करून भ्याडपणा मात्र पदरीं घेऊं नये!

कुणाबद्दलची खोटी स्तुति ऐकण्याचा मला फार कंटाळा आहे. त्यापेक्षां त्याच त्याच ग्रामोफोन रेकॉर्ड्स ऐकत बसणें मी पत्करीन!

—परटाकडे धुवायला दिलेले कपडे कसे स्वच्छ असणार? त्याचप्रमाणें अपुरे आणि विकारशील आयुष्य— सर्वस्वीं स्तुतीस कसें पात्र असणार?

—आपला विकास व्हावा अशी इच्छा असेल, तर खोटी स्तुति ऐकण्याचा मोह आपण टाळला पाहिजे. आणि ताकद असेल तर अशा खोट्या स्तुतीची कलमें निर्दयपणानें तोडून टाकलीं पाहिजेत.

तेंहि एक महत्त्वाचें सामाजिक कार्य आहे!

—मानव्याचा विकास जर खुरटला असेल तर या खोट्या, भित्र्या आणि स्वार्थी स्तुतीमुळें! जगांत खोटे साधु निर्माण होतात आणि पोसले जातात— या असल्या भित्र्या स्तुतीमुळें आणि गौरवामुळें. काय म्हणतात ती भांडवलशाही, जोपासली जाते— या लुबऱ्या स्तुतीमुळें! जें जनावर ज्या जातीचें आहे त्या नांवानेंच तें ओळखलें गेलें पाहिजे!

— मानव्याचा विकास याच्यावर अवलंबून आहे!

---

# प्रवासी : : ५

माझा योगच असा आहे कीं मी केव्हांहि प्रवासाला निघालों तरी माझ्या डब्यांत कधीं नवयौवना दिसल्या आहेत असें कधीं होतच नाहीं; आणि मलाहि खरें म्हटलें तर त्यामुळें बरें वाटतें. आयुष्यांत अनुभविलें तेंच जर कादंबरी-गोष्टींत वाचलें तर त्याला नावीन्याची चव कुठली येणार ? तेव्हां गोष्टी-कादंबऱ्यांत अशा यौवनांचा सहवास नेहमीं घडत असल्यामुळें प्रत्यक्ष प्रवासांत त्या न दिसण्यांतच खरें वैशिष्ट्य नव्हे काय ?

परवां सहज नाशिकहून परत येत होतों. डब्यांत नवयौवनांशिवाय माणसांची बहुतेक बाजारपेठ दिसत होती. मनाला जरा मौज वाटली. प्रवासांत म्हणून वाचायला आणलेली कादंबरी कंटाळून बरोबरच्या सामानांत बंदोबस्तानें बांधून ठेविली; आणि डब्यांत सामावलेल्या जीवनाच्या त्या उघड्या कादंबरींतील कांहीं मजकूर वाचतां येतो का हें मी अजमावूं लागलों.

वेळ रात्रीची होती. गाडीनें वेग घेतलेला होता. गार वारा वाहत होता. माझ्या डब्यांतले निम्मे प्रवासी झोपण्याच्या तयारीला लागले होते. कांहीं

आपआपसांत बातचीत करीत होते. दोन-तीन बिनतिकिटानें प्रवास करणारे उतारू कावऱ्या-बावऱ्या नजरेनें इकडे तिकडे पाहत होते. ते भिकारी नव्हते.

—पण एक भिकारी मात्र कोपऱ्यांत अंग चोरून उभा होता. त्याच्या अंगांत कांहीं नव्हतें. एक लुंगीवजा पंचा कमरेभोंवतीं गुंडाळलेला होता. आणि खांद्यावर एक कसलें तरी गाठोडें दिसत होतें. एका हातांत एक वांकडीतिकडी काठी होती. –तिच्या आधारानेंच तो उभा होता. त्याचें वय होतें चाळीस-पंचेचाळीसच्या सुमारास.

त्याची अंगकाठी किरकोळ होती; पण काटक दिसत होती; आणि त्याला इलाजहि नव्हता. उन्हा-तान्हांत, थंडी-वाऱ्यांत उघड्या अंगानें त्याच्या जीवनाचा प्रवास चाललेला होता. कपाळावर आणि दंडांवर भस्माचे पट्टे ओढलेले होते. भुवयांमध्यें शेंदराचा ठिपका दिसत होता. त्याची दृष्टि मित्री नव्हती तर निराशेनें स्थिरावलेली आणि जणूं जगावर कसली तरी जहरी टीका करीत असलेली दिसत होती. तो उभा होता व त्याच्याजवळची खिडकी उघडीच होती. गार वारा त्याच्या अंगाला झोंबत होता.

थंडीनें कुडकुडणारें शरीर संभाळीत तो मार्ग काढीत माझ्याजवळ आला. कोणत्या तरी देवाचें नांव त्यानें उच्चारलें आणि मला कांहीं खुणवूं लागला.

गाडीनें नुकतेंच कसारा स्टेशन सोडलें होतें. मीं वेळ जाण्याकरितां दोन चार भाजल्या 'शेंगां'चे पुडे घेतले होते. आणि त्यांतील एक पुडा उघडून मीं शेंगा खायला सुरुवात केली होती.

त्या भिकाऱ्याच्या खुणेचा अर्थ मी समजलों. तिकीट इन्स्पेक्टरला चुकविण्याकरितां त्याला बाकाखालीं पडून राहायचें होतें.

मी त्याला विचारलें, "कुठें जाणार?"

डब्यांतल्या दिव्यावर नजर स्थिरावीत तो म्हणाला, "हरिद्वार!"

तो माझ्या खालच्या बाकाखालीं अंगाची वळकटी करून पडला. माझ्या मनांत त्याच्याविषयींच विचार चालूं झाले. खात असलेल्या शेंगांचीं फोलपटें मी खालीं टाकीत होतों.

मला वाटलें पांच-दहा मिनिटांनीं त्या खालीं पडलेल्या शेंगांच्या फोलपटां-

तून कसली तरी बारीक सळसळ मला ऐकूं आली. मीं कानोसा घेतला. बाकाखालीं झोपलेल्या भिकाऱ्याचा हात त्या फोलपटांमधून फिरत होता !

माझ्या छातींतून कसली तरी एक बारीक कळ निघाली. फोलपटांतून क्वचित् एखादा दाणा चुकून पडला असला, तर त्या भिकाऱ्याच्या पोटांतील वैश्वानराला हवा होता वाटतें ! मी सदिच्छेनें मुद्दाम कांहीं दाणे खालीं टाकूं लागलों असें म्हणत नाहीं— पण माझ्या हातांतून कांहीं दाणे आपोआप खालीं गळून पडूं लागले; आणि शेवटीं तर घरच्या लहान मुलाला आपण शेंगा सोलून द्याव्यात त्याप्रमाणें, मी शेंगा सोलून दाणे खालीं टाकूं लागलों आणि फोलपटें हातरुमालांत सांचवूं लागलों.

अखेर माझ्याजवळच्या शेंगा संपल्या. मीं रुमालांत सांचलेलीं फोलपटें खिडकीबाहेर फेकून दिलीं. आणि रुमालानें माझी बसती जागा झाडून विषण्ण मनानें डब्यांत कुठें तरी पाहूं लागलों.

तोंच बाकाखालचा भिकारी माझ्यासमोर येऊन उभा राहिला व हातांची रिकामी ओंजळ ओठाला लावीत माझ्याजवळच्या भरलेल्या तांब्याकडे पाहत पाणी मागूं लागला.

त्या पाणी मागण्यांत मात्र हलाखी नव्हती !

कारण असेंहि असावें कदाचित्, कीं पाण्याला पैसा पडत नसल्यामुळें तें एकमेकांनीं एकमेकांजवळ मागण्यांत कांहीं कमीपणा नसावा !

मीं तांब्या त्याच्यापुढें केला. तो हातांची ओंजळ ओठाला लावीतच खालीं बसला. मी तांब्यांतील पाणी त्याच्या ओंजळींत ओतूं लागलों आणि तांब्यांतील पाणी संपेपर्यंत त्याचें पाणी पिणें चाललें होतें. पाणी संपल्यावर त्यानें आपली ओंजळ खालीं केली; आणि मालकाची लहर संपतांच जनावर जसें पिंजऱ्यांत जावें त्याचप्रमाणें तो माझ्या बाकाखालीं जाऊन झोपला.

अशा थंडींतहि तांब्याभर पाणी बिनधोक पिणाऱ्या व पचविणाऱ्या त्या भिकाऱ्याबद्दल मला आदर वाटूं लागला.

—आणि कांहीं वेळानें मीहि झोपीं गेलों.

नंतर मला वाटतें थोड्या वेळांतच डब्यांत चालणाऱ्या कांहीं तरी बोलाचालीनें मी जागा झालों.

मीं पडल्या-पडल्याच डब्यांत नजर फिरविली. दरवेशासमोर अस्वल उभें राहावें त्याप्रमाणें, तिकीट इन्स्पेक्टरसमोर तो माझ्या बाकाखालचा भिकारी उभा होता! पण त्याची बोलण्याची पद्धत मात्र थोडी मग्रुरीची मला वाटली. जणूं जगाचे मालक कोण—तो तिकीट इन्स्पेक्टर का तो भिकारी असा त्यांच्यांत वाद चालला होता.

" कुठं जाणार ? "

" हरिद्वार ! "

" तिथं कोण राहतं तुझं ? "

" माझाच काय, सर्वांचाच बाप राहतो तिथं ! "

" ए ! झूट बोलूं नको ! तुझ्या त्या बापानं रेल्वेला लई सतावलाय. त्याचे तुझ्यासारखे भिकारी दोस्त रेल्वेंतून मोफत प्रवास करून रेल्वेला फार गंडवतात ! साला— जन्मभर भीक मागून आम्हां लोकांना सतावतां—"

खरंच; भिकाऱ्यांबद्दल लोक अद्वातद्वा बोलतात तेव्हां माझ्या मनाला असा प्रश्न पडतो, कीं त्या भिकाऱ्याचा का भिकारीच राहण्याबद्दलचाच हट्ट असेल? त्या तिकीट इन्स्पेक्टराचा पोषाक जर त्या भिकाऱ्याच्या अंगावर घातला असता तर तो काय त्याच्या अंगाला आला नसता ?

त्या भिकाऱ्याच्या अंगावर जर तो इन्स्पेक्टराचा पोषाक आला असता तर कपडे गेल्यामुळें खालीं राहिलेल्या त्या उघड्या माणसानें बिनातिकीट प्रवास केला नसता काय ?

आणि मग त्यानेंहि परमेश्वराच्या दर्शनाचाच हवाला दिला नसता काय ? जगाचें रहाटगाडगें जोंपर्यंत आहे याच मार्गानें चालूं आहे— तोंपर्यंत हरिद्वारचे प्रवासी कायम राहणारच !

" तुझ्याजवळ पैसे आहेत का नाहींत ? "

" नाहींत ! "

" सोड तुझं गाठोडं. परवां एक तुझ्यासारखाच साधू रेल्वेच्या डब्यांत गारठून मेला. साल्याच्या गाठोड्यांत दहा हजारांच्या नोटा निघाल्या ! "

तो भिकारी आपलें गाठोडें तिकीट इन्स्पेक्टरला सोडून दाखवूं लागला. गाठोड्यांत सांगण्यासारखें कांहींच नव्हतें !

हो, गाठोड्याच्या एका कोपऱ्यांत कागदांत गुंडाळलेले चार-पांच पेढे होते! कुणी तरी ते त्याला दिलेले होते आणि जसे चार पैसे आपण मागें टाकावे तसे त्यानें ते पेढे शिल्लक ठेवले होते.

तिकीट इन्स्पेक्टर स्वभावानें विनोदी होता; आणि दारिद्र्यावर विनोद कुणालाहि सुचतो! त्यानें तो पुडा हस्तगत केला आणि म्हणाला, "लेका पेढे जवळ बाळगणारा तूं चांगलाच भिकारी दिसतोस कीं!" त्यांतील एक पेढा स्वतः तोंडांत टाकीत इन्स्पेक्टर म्हणाला!

तो भिकारी उकिडवा बसून गुडघ्यावर हात ठेवीत तिकीट इन्स्पेक्टरकडे पाहत राहिला!

—आणि जेव्हां गाडी स्टेशनवर उभी राहिली तेव्हां तिकीट इन्स्पेक्टरनें त्या भिकाऱ्याला मान धरून खालीं काढलें!

मला वाटतें, भिक्षा मागणें हा सुद्धां एक प्रामाणिकपणाचा धंदा आहे! जोंपर्यंत आत्महत्या हा गुन्हा ठरतो— आणि पोटाला कांहीं मिळत नाहीं तोंपर्यंत चोऱ्या, दरोडेखोरी वगैरे बेकारांचे उद्योग सोडल्यास— भिक्षा मागणें हा प्रामाणिकपणाचा धंदा नव्हे काय?

—आणि आपण आपले धंदे तपासून पाहिले तर त्यांत भिक्षेचा, सहानुभूतीचा वास कुठें येत नाहीं काय?

सगळें जग भिक्षेवर जगत आहे! आणि, एका धंदेवाल्यानें दुसऱ्या धंदेवाल्याची नालस्ती करावी त्याप्रमाणें भिक्षेकऱ्यांवर आपण निष्कारण आग पाखडतों!

भिक्षेकऱ्यांनीं आपलें संघटण केलें, त्यांनीं आपली संस्था बनविली तर तीच खरी राष्ट्रीय संस्था होईल—तीच खरी प्रातिनिधिक संस्था होईल! कारण खरी भूक त्यांची आहे!

राहायला जागा नाहीं— प्रवासांत वेळ काढतील तर तिकीट नाहीं— पोटाला मिळत नाहीं— आणि तींहि माणसें आहेत!

गरजेपेक्षां जास्त पैसा जवळ बाळगून आपण गृहस्थांनीं त्यांना भिक्षेकरी बनविलें आहे— तेव्हां त्यांना समाधानानें मूठभर भिक्षा घालणें आणि त्यांची मारक संघटना होऊं न देणें यांतच आपला तरणोपाय आहे—

नाहीं तर आत्महत्या हें पाप असल्यामुळें— दुसऱ्याला मारणें आणि स्वतः जगून आत्महत्या टाळणें हें त्यांचें जीवितकार्य ठरेल !

—वगैरे माझे विचार करून होत आहेत तोंच गाडी स्टेशनांतून सुटली आणि गाडीनें वेग घ्यायच्या आंत आमच्या डब्याचें दार उघडून एक इसम आंत घुसला.

तो खालीं उतरलेला भिकारीच होता.

मी त्याच्या चिकाटीबद्दल खूष झालों आणि राहिलेला प्रवास त्याच्याशीं बोलत करण्याचें ठरविलें.

" आपलें वय काय ? " मीं विचारलें.

त्याला अरे-तुरे म्हणण्याचेंहि धाडस मला होईना.

" ध्यानांत नाहीं ! "

" वस्ती कुठं ? "

" रात्रीं रेल्वेच्या डब्यांत आणि दिवसा उतरूं त्या गांवांत ! "

" असे किती दिवस काढणार ? "

" मरेपर्यंत ! "

—आणि खरेंच, दुसरें त्यानें काय करणें शक्य होतें ? आपण जसें कांहीं तरी एक ध्येय ठरवून वाटेल तसें वागत असतों त्याप्रमाणें 'हरिद्वार' हें त्यानें प्रवासाचें ठिकाण ठरविलें होतें. आणि गाडी सापडेल तिथें तो वर चढत होता; आणि तिकीट इन्स्पेक्टर भेटला कीं खालीं उतरत होता. मीं त्याला विचारलें, " हरिद्वाराला किती वेळा जाऊन आलांत ? "

" एकदांहि नाहीं ! " तो हसत म्हणाला. " दुपारीं कुठं खायला मिळालं कीं हरिद्वाराला गेल्यासारखं वाटतं— पण तें समाधान संध्याकाळला टिकत नाहीं—सकाळ-संध्याकाळ पोटांत कांहीं तरी घालणं हीच आमची हरिद्वारची यात्रा. ती रोज चालली आहे ! आमच्या जीवनांत अपमान ही चजिच राहिलेली नाहीं— तुम्ही अहो-जाहो म्हणत आहांत— तेंच कसंसच वाटत आहे मला— असा जीवनाचा प्रवास चालला आहे. या प्रवासांत शेवटीं जेव्हां आणि जिथं धरणीवर देह पडेल तेंच आमचें हरिद्वार ! "

या शब्दांत त्या भिकाऱ्यानें सांगितलें नव्हतें! यांतल्या भावना त्याच्या आहेत; शब्द माझे आहेत. कारण पुष्कळ वेळेला तो अभिनयानें बोलत होता. अडखळत बोलत होता;—पण भावार्थ मात्र त्याचा आहे !

संभावितपणानें भिक्षेकरी अजून आपल्याला मोठे समजत आहेत तोंपर्यंत त्यांना जास्त खिजवूं नये असें मला वाटतें. आपल्या अन्नांत त्यांचा वाटा आहे. कारण त्यांच्याशिवाय राहिलेल्या मालमत्तेचें आणि जगाचें खरेदीखत कांहीं आपल्या नांवानें झालेलें नाहीं! आपण करीत आलेल्या कोणत्याहि धंद्याप्रमाणें भिक्षा मागणें हासुद्धां पोटाचा धंदा आहे!

—आणि केवळ पोटाचा धंदा आहे !

आपल्या धंद्यांत लौकिकाचाहि एक भाग असतो—तो तर त्या धंद्यांत अजीबात नाहीं! किती निर्लेप धंदा आहे तो! आणि तो धंदा तेच करीत आहेत म्हणून आपण त्यांचें अभिनंदन केलें पाहिजे; कारण उद्यां शिरजोर होऊन, ते जर प्रामाणिकपणाचे आपण करीत असलेले धंदे करायला लागले तर त्यांचा धंदा करायची पाळी आपल्यावर येईल! म्हणून तरी 'भिक्षेकरी' या शब्दाची आणि वर्गाची बदनामी आपण करतां कामा नये!

—त्याच्या सान्निध्यानें वरील विचार माझ्या मनांत यायला लागले तेव्हां मीं चहा मागविला. त्या भिक्षेकऱ्यालाहि चहा मागविण्याचें तेव्हां माझ्या मनांत नव्हतें— पण चहावाला पोऱ्या 'काय आणूं?' म्हणून मला विचारूं लागला तेव्हां माझ्या तोंडून शब्द गेले—

"—दोन कप चहा!"

—एक-दोन मिनिटांतच चहावाल्यानें दोन कप चहा आणून आमच्यापुढें केला.

—मीं एक कप चहा घेतला आणि दुसरा कप घेण्याकरितां त्या भिकाऱ्याला खुणविलें.

—पण चहाच्या कपाला हात लावण्यापूर्वी तो माझ्याकडे पाहत किती केविलवाणेपणानें हसला!

नंतर तो बाकावरून उठून लांब जाऊन उभा राहिला— आणि चहा-वाल्यास त्यानें तिथें हाक मारली.

—अत्यंत कापऱ्या हातानें त्यानें चहावाल्याकडून तो कप घेतला. आणि तो तिथेंच उभ्या-उभ्यानें चहा पिऊं लागला.

—मीं त्याला खूण करून जवळ बोलाविलें आणि माझ्या शेजारीं बसून चहा घ्यायला खुणविलें.

तो अजीजीच्या आविर्भावानें मला तिथूनच 'नको' म्हणून खुणवूं लागला.

इतक्यांत माझ्या शेजारच्या एका प्रवाशाला तें सहन झालें नाहीं. तो त्या भिकाऱ्याला कुत्सितपणानें म्हणाला,

" अरे रावसाहेब येवढें जवळ बसवून तुला चहा पाजायला तयार आहेत तर तूं कां लाजतोस ? "

—भिकाऱ्यानें ते ऐकून एकदां माझ्याकडे पाहिलें आणि त्याला काय वाटलें कुणास ठाऊक, तो थोडा धीट झाला आणि माझ्या शेजारीं बसून तो चहा पिऊं लागला.

—आणि मग आमच्या डब्याला एक चर्चेला विषय मिळाला.

—कोणी माझी चेष्टा करूं लागले. कुणाला माझ्या या सहानुभूतीचें कौतुक वाटूं लागलें.

—आणि मी मात्र मनांत विचार करूं लागलों— कीं, " मी जे त्या भिकाऱ्याशीं वागत होतों ती निर्भेळ दया होती का ? "

—माझें मनच याला 'होकारार्थी' उत्तर देऊं शकत नव्हतें.

—आपण जी दया दाखवितों ती अगदीं निर्हेतुक असते असें मला तरी वाटत नाहीं !

ती दया भीतीच्या पोटीं उत्पन्न झालेली असते !

—आज तो अडचणींत आहे— तो माणूस आहे— आपणाहि माणूसच आहोंत—आज तो अन्नान्नदशेंत आहे—आपणाहि उद्यां कदाचित्— ?

—अशा एका अस्पष्ट विचाराची भीति आपल्या मनाला कंप आणते— आणि त्या कंपनानेंच आपला हात दातृत्वासाठीं आपल्या खिशाकडे वळतो !

## प्रामाणिकपणा : : ६

दुपारचें ऊन तापत होतें. माझी नुकतीच दुपारची झोप झाली होती. माझ्या शरीराची झोप संपली होती; पण मन अजून पुरतें जागें झालें नव्हतें.

दुपारच्या चहाच्या वेळेला अजून जरा अवकाश होता. मीं गॅलरींत येऊन एका खुर्चीवर बसलों. मनाला कांहीं तरी चाळा हवा म्हणून त्या दिवशीचीं वर्तमानपत्रें सर्व वाचून झालेलीं असल्यामुळें कोपऱ्यांतील एक जुनें वर्तमान-पत्र मीं घेतलें आणि तें वाचूं लागलों.

त्या वर्तमानपत्राची तारीख इतकी जुनी होती, कीं त्यांत फ्रान्स अजून पडायचा होता. त्याच्या वीरोचित आणि जयिष्णु गर्जना त्यांत गर्जत होत्या!

एखाद्या चित्रावर जाळीदार रुमाल टाकून तें चित्र पाहिलें तर तें जसें कातरलेलें आणि सांधलेलें दिसेल, त्याचप्रमाणें त्या फ्रान्सच्या गर्जनांवर नंतर घडलेल्या घटनांचा जाळीदार रुमाल मीं आपल्या कल्पनेनं टाकला. त्यामुळें त्या छापील 'जयिष्णु' गर्जना मला केविलवाण्या वाटायला लागल्या!

मनुष्य आपलें चांगलें बोलत असतो— आणि व्हायचें असतें तेंच होतें;

हा अशा या घटनांचा अर्थ?— का असें हें बोलणें केवळ वर केलेल्या पोषाकाप्रमाणें असतें? अंगाचे कपडे आपल्या मापाचे नसले, म्हणजे मोठे असले किंवा लहान असले, तर ते जसे चांगले असले तरी लवकर फाटून किंवा घाण होऊन जातात त्याचप्रमाणें बोललेले शब्द चांगले असतील पण परिस्थितीच्या शरीराला ते झेपत नसतील!

मी हातांतील त्या जुन्या वर्तमानपत्राकडे केविलवाण्या काकुळतीनें पाहत हसत होतों तोंच, एक चौकडी रस्त्यावर माझ्यासमोर येऊन उभी राहिली आणि त्यांनीं अत्यंत आदरानें लवून मला म्हटलें,

"रावसाहेब, रामराम?"

घरांत झालेले डास जसे येतां जातां चावावेत, त्याप्रमाणें समाजांत निरर्थक स्तुतीचें डास एकसारखे घोंघावत असतात; आणि जरा आपण स्वस्थ बसलों, कीं असा एखादा डास आपल्या कानासभोंवतीं लगेच घोंघावयाला लागतो.

मीं त्या चौकडीकडे पाहिलें. चौघेही भले उंचेपुरे होते. एकाच्या डोक्याला गुलाबी व एकाच्या डोक्याला पिवळा फेटा होता. एकाच्या डोक्याला गांधीटोपी होती, आणि एकाच्या डोक्याचा पांढरा रुमाल त्यानें उशीसारखा काखेंत आवळून धरला होता. त्याच्या कानावर एक जळकी विझवलेली विडी होती!

मी त्यांच्याकडे असा निरीक्षणाकरितां पाहत होतों. पुन्हा चौघांनीं मला रामराम करीत म्हटलें, "दादासाहेब, रामराम!!"

मीं फक्त हसून त्या रामरामाचा स्वीकार केला, आणि त्या चौघां बाबा-साहेबांकडे निरखून पाहूं लागलों.

त्या चौघांचेहि डोळे पाणीदार आणि धारदार दिसत होते. त्यांत कांहीं घारे होते आणि कांहीं काळे होते. त्यांतील एकाचे डोळे मला आर्जवी वाटले, एकाचे करारी वाटले, एकाचे विलासी वाटले आणि चौथ्याचे नुसते हसतेखिदळते वाटले.

त्या चौघांच्याहि अंगावरचे कपडे उघडाउघड जुन्या बाजारांतले दिसत होते. पलटणींतले जुने निळे शर्ट, खाकी कोट, तीं लष्करी पितळेचीं बटणें—

—त्यांतील एक, ज्याचे डोळे हसते-खेळते होते म्हणून मीं वर सांगितलें, तो मजेनें सिगारेट पीत होता. ती त्यानें फेकून दिली आणि मोकळ्या झालेल्या हातांनीं मला नमस्कार करीत तो म्हणाला,

" दादा, हाये काइ रद्दी, बाटल्या, डबं, जुनं जोडं ? "

ते पावसाळ्याचे सरते दिवस होते. माझ्याशीं बोलायला त्यांतील एकानें अशी सुरुवात केली आणि दुसरे दोघेजण आपल्या डोक्याचे रंगीत फेटे चापून-चोपून पाहत उभे होते; आणि चौथा जो राहिला होता, त्याचें समोरच्या ओलसर गटाराकडे लक्ष गेलें. तेथें त्याला कांहीं आशा निर्माण झाली. तो तडक आपल्या हातांतल्या लहानशा लोखंडी गजानें तें गटार उकरूं लागला. नदींतील मासे धरण्याकरितां गळाला लावायला तो गटारांतली गांडुळें गोळा करीत होता !

जीवनकलहाचे किंवा जीवनकलेचे काय अभिनव प्रकार आहेत !

—माझ्या मनाची कांहीं तरी गमतीदार उघडझाप चालली होती.

" दादा, काढा ना कांहीं रद्दी—टाइम्स, रद्दी कागद."

मी कांहीं उत्तर न देतांच त्यांच्याकडे हसऱ्या चेहऱ्यानें पाहत उभा राहिलों. त्यांनाहि कांहीं तरी आधार आला वाटतें. त्यांच्यांतील दोघांनीं जवळच्या पोत्यांची घडी रस्त्यावर टाकून त्यांवर रस्त्यांतच बैठक मारली.

आणि राहिलेला एक माझ्याशीं बोलूं लागला,

" दादासाहेब, काय भरऽल दहावीस शेर रद्दी ? "

" अरे, दहावीस शेर का, चांगली पांचदहा मण रद्दी भरेल; पण तुमच्याशीं हुजत कोणी घालीत बसायचं ? आणि वजनाची घासाघीस कोणी घालायची ? "

" रावसाहेऽब ! तसलं धंदेवाले आम्ही नव्हत हं ! या बाजूला पांचसहा वर्षं तरी आमची रीघ आहे ! तसं धंदं केलं असतं, तर मायबाप, अशा उजळ तोंडानं फिरलों असतों व्हय् या रस्त्यानं ? मायबाप, प्रामाणिकपणाशिवाय धंद्याला बरकत नाहीं ! "

बैठक मारून बसलेल्या दोघां आदमींतील एकानें खिशांत सापडलेली रस्त्यावरची विड्या-सिगरेटचीं थोटकें बाहेर काढलीं आणि त्यांतील आतां

ओढण्यासारखें कोणतें आहे त्याची तो निवड करूं लागला. मिनिटां-दोन मिनिटांत तीं दोन धुराडीं चालू झालीं!

" मग काय बसूं होय रावसाब ?"

" काय भावानं घेणार रे रद्दी, मण ?"

" आतां धनी आपल्याला काय सांगायला हवं ! बाजारभावानं घेईन धनी !"

" पण बाजारभाव काय आहे तो तर सांगशील ?"

" तीन आणे शेर– सरसकट ! इंग्रजी वर्तमानपत्राला भाव आहे, धनी; पण मराठी वर्तमानपत्राला तितका भाव येत नाहीं !"

" वजन अगदीं खरं खरं करणार का रे पण ? का वजनांत पांच-दहा शेराला झोका देणार ?"

" रावसाहेऽब ! तशांतलीं नव्हंत आम्ही माणसं ! असं करून कुठं धंदा चालतोय् व्हय् ? धनी, या आळींत तुम्ही कुणालाहि पुसा—लबाडीचा पैसा धार्जिणा नाहीं होत रावसाहेब ! अन्, याच धंद्यावरच जगायचं धनी ! समजा, आम्हीं आपल्याशीं एक वक्ताला लबाडी केली, धनी आम्हांला पुन्हा तुम्ही खेटराशीं तरी उभं कराल ?" त्यानें मला असा सवाल टाकला— आणि त्याबरोबर त्याचे तिन्हीहि साथीदार हात जोडून माझ्यापुढें उभे राहिले.

मला त्या प्रसंगाची मोठी मौज वाटत होती. मला त्यांच्याविषयीं थोडी सहानुभूति वाटायला लागली होती हें त्यांनींहि हेरलें होतें. माझ्यापेक्षां त्यांचें मानवी स्वभावाचें ज्ञान निःसंशय श्रेष्ठ दर्जाचें होतें. कारण ते त्या स्वभावज्ञानावरच जगत होते !

" धनी, वाइच पाणी प्यायचं हाय– नळ हाय काय आंगणांत ?"

मीं त्यांना नळाकडे बोट दाखविलें.

चौघेहि एकामागून एक पाणी पिऊन ताजेतवाने झाले.

नंतर त्यांतील एकानें विडी शिलगावण्याकरितां माझ्यापासून सलगीनें आगपेटीहि मागून घेतली.

मीं माझ्या माणसाला रद्दी बाहेर काढायला सांगितली.

"धनी, सगळी नका काढूं! येवढा पैसा नाहीं आज जवळ! आज निम्मी नेऊं आणि उद्यां बाकीची नेऊं!"

चौदा-चौदा शेरांचे सहा गठ्ठे वजन झाले.

"धनी, करा हिशोब."

"हं, सहा गठ्ठे झाले चौदा शेरांचे, म्हणजे चौदा पंचे सत्तर शेर. तीन आण्यांप्रमाणें दोनशें दहा आणे होतात; म्हणजे तेरा रुपये दोन आणे झाले. आहे ना बरोबर?"

ते चौघे एकमेकांकडे कावरेबावरे पाहूं लागले. माझ्या हिशोबानें त्यांचा प्रामाणिकपणा चुळबुळायला लागला होता. माझ्याकडे झटकन कोणी दृष्टि वळवीना.

मीं विचारलें, "कां रे, बरोबर आहे ना हिशोब?"

"धनी, आपल्या म्होरं आम्हीं काय हिशोब करणार? म्हंजे काय म्हनतां— तेरा रुपये आणि दोन आणे झाले व्हय्?" किंचित् माझ्याकडे— पण खरें म्हणजे जमिनीकडेच पाहत त्यांतील एक म्हणाला.

"हं, तेरा रुपये दोन आणे झाले. १४ शेरांचे सहा गठ्ठे– पाहा हिशोब करून!" ते चौघेजणाहि पायरीवर बसले. प्रत्येकानें आपल्या खिशांतील पाकीट पिशव्या पायरीवर ओतल्या आणि त्यांतील नाणें-खुर्दा ते मोजूं लागले.

मी त्या प्रसंगांतून मन काढण्याकरितां पुन्हा तें जुनें वर्तमानपत्र वाचण्याचा प्रयत्न करूं लागलों.

किंचित् कावरेबावरेपणानें– किंचित् केविलवाणेपणानें ते आपल्यापुढील पैसे मोजीत होते. कांहीं तरी हिशेब करीत होते. जवळ जवळ अर्धा तास त्यांनीं असा घालवला.

शेवटीं एकानें खुर्दा मोजीत म्हटलें, "अरे, हे खोटे पैसे काढ बाजूला, रावसाहेब आपल्याशीं इतक्या ह्यानं वागतात— अन् हे खोटे पैसे द्यायचे होय आपण त्यांना! हात् तुझी! खूप शाना आहेस!"

वर्तमानपत्रापेक्षां माझें त्यांच्याकडे खरें लक्ष होतें.

बाकीचे तिघे एकाला खुणावीत होते “तूंच दे पैसे नेऊन--आम्ही गठ्ठे बांधतों तोंपर्यंत!”

आणि ते एकमेक एकमेकांना मला पैसे देण्याबद्दल खुणावीत होते. शेवटीं त्यांचा म्होरक्या माझ्यापुढें आला आणि दोन्ही गालांवर आपले तळहात चोळीत म्हणाला, “धनी, तेरा रुपये दोन आणं–झालं नव्हं? पण समद्यां-जवळचं मिळून तेराच रुपयं भरतात–दोन आणं उद्यांला दिलं तर चालतील?”

मीं त्याच्याकडे रोखून पाहत म्हटलें, “तुमच्यासारख्या प्रामाणिक माणसां-वर विश्वास ठेवायला काय हरकत आहे? ठेव तिथं पैसे!”

त्यानें मुकाटपणें पैसे माझ्यापुढें ठेवले व रद्दीचे गठ्ठे ते उचलूं लागले.

जातांनाहि मीं त्यांना पुन्हा बजावलें, “सहा गठ्ठे आहेत हं रद्दीचे–प्रत्येकीं चौदा शेरांप्रमाणं—”

नुसतीच मान डोलवीत ते चौघेहि नाहींसे झाले!

“प्रामाणिकपणा—सत्य—” मी स्वतःशींच पुटपुटलों!

“आमची बाजू न्याय्य आहे– शेवटीं यशावर आमचाच हक्क आहे—” फ्रान्सच्या कोणत्या तरी पुढाऱ्याचे ते उद्गार होते. राहिलेल्या रद्दींत मी तें जुनें वर्तमानपत्र फेकून दिलें, आणि मी आपल्या कामाला लागलों.

—दुसऱ्या दिवशीं सकाळीं मीं नव्या उत्साहानें कामाला लागलों होतों. कालचा प्रसंग मी सर्व विसरून गेलें होतों.

तोंच बाहेरून आरोळी आली, “रावसाहेब!”

त्या पहिल्या हाकेकडे मीं लक्षच दिलें नाहीं!

दुसरी हाक आली, “धनीसाहेब, रावसाहेब!”

अखेरशेवटीं मीं चिडीनें उठून बाहेर आलों. त्या चौघांनीं मला लवून रामराम केला आणि त्यांतील म्होरक्यानें माझ्यापुढें कालचे राहिलेले दोन आणे टाकीत म्हटलें, “शिलकी रद्दी काढा रावसाहेब!”

“कालच्यांतले आणखी पैसे राहिले आहेत तुमच्याकडे ते काढा अगोदर!”

माझे हे शब्द ऐकतांच त्यांतील दोघे कावरेबावरे झाले आणि बोलत बोलत कोपऱ्यावर जाऊन उभे राहिले.

" दोन आणे राहिले ते दिले नव्हं का धनी— ? "

" होय, ते पोंचले; आणखी दोन रुपये दहा आणे राहिले आहेत ! "

" धनी, हें नसतं बालंट आहे बघा आमच्यावर ! बघा आतां, तुम्हींच हिशेब केलांत—"

मीं विचारलें " कालचा प्रत्येक गठ्ठा किती शेरांचा होता ? "

" चौदा शेरांचा होता, मायबाप ! "

" गठ्ठे किती होते ? "

" पांच, रावसाहेब—"

" मूर्खा, खोटं बोलतोस का ? सहा गठ्ठे नव्हते का ? "

" नाहीं धनी. पांचच होते–आपणच नाहीं हिशोब केलात चौदा पंचे सत्तर म्हणून—"

" मीं तुमच्या प्रामाणिकपणाची परीक्षा पाहत होतों—"

" धनी, काय कुभांड हें ! –अहो, आईबापाच्यान पांच गठ्ठे होते. आणि बाबासाहेब एवढ्या पैशांत–एवढं खोटं बोलून काय जन्माचं कल्याण व्हायचंय् धनी ? "

प्रसंगाशीं तो खोटें बोलत होता; पण स्वतंत्र रीत्या तें किती खरें होतें ? अनुसंधान कांहींच नसतांना, कालचे वर्तमानपत्रांतील फ्रान्सच्या आणीबाणीच्या प्रसंगाचे धीरोद्गार मला आठवले.

**" जगांतील लोकशाही संकटांत सापडली आहे; तिच्या संरक्षणाकरितां आमचें हें धर्मयुद्ध आहे! अंतिम जय हा आमचाच आहे ! "**

पुन्हा जाळीदार छिद्रांचा रुमाल माझ्या कल्पनेनं त्या वाक्यावर टाकला. आणि मन चुळबुळूं लागलें– सत्याचा जय कां झाला नाहीं ?

पुन्हा ते रद्दीवाले माझ्यासमोर उभे राहिले.

" धनी, राहिलेली रद्दी द्यायची नसेल तर देऊं नका ! पण असा खोटा आरोप आमच्यावर करूं नका ! धनी, कुठंहि पोट भरूं आम्ही ! धनी, आजपर्यंत आम्हीं प्रमाणिकपणं धंदा केला आहे ! आमच्यावरचा हा खोटा आरोप ढासळून पडेल धनी ! "

मीं म्हटलें, " मला रद्दी विकायची नाहीं ! " आणि जास्त बोलणें वाढूं नये म्हणून मी अंगांत कोट घालून सायकल घेऊन बाहेर पडलों.

तीं चार माणसें माझ्यापुढेंच निघालीं.

—आणि जवळच एक बोळ होता तिथल्या एका घराच्या चौथऱ्यावर बसून राहिलीं. मी सायकल घेऊन बाहेर पडलों. इतक्यांत मला कोणी तरी स्नेही भेटला म्हणून कोपऱ्यावर बोलत उभा राहिलों; तों मला खालील शब्द ऐकूं आले:—

" अरे, रावसाब लुच्चा दिसतोय बरं का ? काल बनवलं कीं आम्हांला त्यांनीं ! मला वाटलं हे शिकलेले लोक हिशोबाला कच्चे असतात, तसा ऐटींत हा हिशोबाला चुकला असेल ! "

" बरं आतां कबूल तरी कसं करायचं ? जास्त मिळालेले पैसे काल गेले कीं नशापाण्यांत ! किती तरी दिवसांनीं काल नशापाणी करायला मिळालं, नाहीं ? "

" आतां मातुर या गल्लीला पुन्हा नको यायला ! "

" कां ? आतां या गल्लींत तर रोज नेमानं यायचं ! आणि दररोज या रावसाहेबालाच हटकायचं; आणि अजीजीनं म्हणायचं, रावसाहेब, हा जुलूम होतोय आमच्यावर ! आमच्यावर नाहक आरोप आहे हा ! आम्ही सच्चे आहोंत ! शेवटपर्यंत तावातावानं ओरडत कांगावा करीत राह्यचं प्रामाणिक-पणाबद्दल ! कांहीं दिवसांनीं रावसाहेबाला सुद्धां भ्रम होईल बघ—खरंच आपण पांचच गठ्ठे दिले नसतील कशावरून ? "

तें ऐकून मला मजा वाटली—गम्मत वाटली परिस्थितीवर व्यवहार कसा उगवतो—त्याला—

—आणि त्या रात्रीं माझें मलाच वाईट वाटलें !

परिस्थितीनें मनुष्य बिलंदर झाला कीं असा बनेल होणारच !

पण प्रामाणिकपणानें वागावेंसें त्यांना वाटत नसेल का ? प्रामाणिकपणा हा चांगला गुण आहे हें त्यांनाहि वाटत नसेल का ? पण परिस्थितीनें त्यांच्या हृदयाचा जिवंतपणा मेलेला असतो— आणि त्यांचीं मनें निर्जीव स्पंजासारखीं झालेलीं असतात.

स्पंज कोणत्याहि चांगल्या किंवा घाण पाण्यांत पडल्यास तो फुगल्याशिवाय राहील का?

मला वाटतें त्यांची प्रामाणिकपणाची परीक्षा पाहण्यांत माझ्याकडून निर्दयपणा झाला. प्रामाणिकपणा त्यांना कबूल होता; पण परिस्थितीनें तो त्यांना पेलण्यासारखा नव्हता!

हाता-तोंडावर जगणाऱ्या माणसाची प्रामाणिकपणाबद्दल परीक्षा पाहणें भयंकर निर्दयपणा आहे! तीं माणसें प्रामाणिकपणाचें महत्त्व मान्य करतात, त्याचीं ब्रीद-वाक्यें वापरतात, हाच त्यांचा चांगुलपणा आहे. त्यांच्यांत त्यांनीं अजून जुनी नीति आणि नवी नीति असा फरक पाडायला सुरुवात केलेली नाहीं.

—थांबा, तो रद्दीवाला आलाच पुन्हा माझ्या दाराशीं.

"बाबासाहेब, का गरीबांचा छळ करतां विनाकारण? देऊन टाका ना आतां राहिलेली रद्दी!"

---

# अखेरचें तत्त्वज्ञान : : ७

मला वाटतें कांहीं तरी दहा-पंधरा दिवस झाले असतील त्या गोष्टीला. तो सबंध दिवस माझा इतका आनंदांत गेला होता कीं, एक अणुमात्र गोष्टहि माझ्या मनाविरुद्ध त्या दिवशीं झाली नाहीं ! घड्याळाची टिक्‌टिक् जशी आपल्या तालांत चाललेली असते तसा तो माझा सबंध दिवस गेला होता !

—आणि रात्रीं झोपतांना सहज कांहीं तरी चाळावें असें वाटलें. वाचण्यासारखें हाताशीं कांहीं लागेना; म्हणून शेजारचा टाइम्स मागून आणला. आणि सहज पहिलें पान चाळूं लागलों; तोंच पहिल्या पानावरच्या चित्राकडे माझें लक्ष गेलें.

—पाडलेल्या जर्मन विमानांतील पकडलेल्या वैमानिकाचें चित्र होतें तें.

—तो पकडलेला जर्मन वैमानिक; त्याच्या फोटोंतील नजरेकडे माझी दृष्टि गेली मात्र; आणि आजच्या माझ्या सबंध दिवसाच्या मनःस्वास्थ्याची होळी झाली !

माझें मन कमालीचें अस्वस्थ झालें– आणि त्या निशेंतच मला वाटतें मला पांच-दहा क्षणांत झोप लागली !

—आणि माझें शरीर झोपेंत लुळेंपांगळें होऊन पडलें आणि मनानें स्वप्नांत भरारी मारली ! एखादा पेटलेला दारूचा बाण उडावा त्याप्रमाणें, कांहीं तरी आवेगानें माझ्या मनानें स्वप्नांत भरारी मारली—आणि—

—कल्पनेनं तो पकडलेला वैमानिक—आपल्या वैमानिक तळावर उड्डाणाकरितां तयार होत होता तेथें गेलें—मीं त्या वेळेला त्याच्याकडे पाहिलें—तो देशभक्तीची दारू पिऊन तर्रर झाला होता !

—देशभक्तीची दारू—होय. देशभक्तीची दारूच म्हणतों मी. त्याला वाटत असावें आपल्या देशावर प्रेम करावें हें ठीक आहे—पण त्याकरितां दुसऱ्या देशांची राखरांगोळी ?

—आपल्याला काय समजतें आहे ? फ्यूरर हिटलर—आऽऽ!! तो आपल्या विमानांत आरूढ झाला !

—वायुवेगानें तें विमान आकाशांत संचारू लागलें— तो स्वतःला विसरला—देशाला विसरला—त्याच्या देहाचें आणि मनाचें राक्षसी यंत्रांत रूपांतर झालें—बस्स, आतां तो आणि बॉम्बगोळे—

—किती ठिकाणें बेचिराख करूं आपण ? किती माणसांचे बळी घेऊं ?

—जितकीं जास्त ठिकाणें आपणाला बेचिराख करतां येतील—तितका आपला अधिक पराक्रम !

—त्याचें विमान उड्डाण घेत घेत ब्रिटनवर आलें !

—वखवखलेल्या नजरेनें—तो बॉम्बगोळ्यांकडे पाहूं लागला !

—इतक्यांत त्याच्या मनांत कांहीं तरी चर्रर झालें !

—त्यानें डोळे मिटले—आपण कांहीं एकटेच नाहीं आहोंत—आज आपण शेंकड्यांनीं निघालों आहोंत—

—त्यानें एक बॉंब खालीं सोडला.

आणि त्याला वाटलें केवढा तरी आवाज झाला !

कित्येक घरें बेचिराख झालीं ! आगडोंब उसळले !!

आपल्या कोटाच्या बाहीवरच्या ‘स्वस्तिक’ चिन्हाकडे त्यानें पाहिलें– त्याला अभिमान वाटला— विजयी जर्मनी ! !

—त्याचें विमान असें कित्येक तास बॉम्ब टाकीत होतें.

—आग, डोंब उसळत होते, घरें बेचिराख होत होतीं !

—अखेरशेवटीं त्याची ठरलेली वेळ आणि बॉम्ब संपले. त्याची देशभक्ती-ची दारू उतरूं लागली– विमान परतूं लागलें !

“चल आपुल्यां घराला !” त्या अक्षराच्या अनुरोधानें त्याचें मन गाऊं लागलें !

—ओः ऽ ! !

—त्याच्या कानठळ्या बसल्या !

—आणि विमानाचा–मागेंपुढें वेग नाहींसा झाला ! आणि गवंड्यानें सोडलेल्या ओळंब्याप्रमाणें त्याचें विमान एका रेषेंत, पण गडगडत खालीं येऊं लागलें !

—त्याचें मन बेशुद्ध झालें !

—तें आतां जर्मनींत गुंतलेलें नव्हतें.

ब्रिटनचा हेवा-दांवा करीत नव्हतें !

—मखमलीच्या पिशवींत कस्तुरी भरून ठेवावी त्याप्रमाणें तें त्याच्या देहाच्या पिशवींत शांत झोपलें होतें !

—आणि नंतरच्या एका सूर्योदयीं तो जागा झाला. आजूबाजू त्याला सर्व नवीन दिसत होती. तुटलेला धागा जोडावा त्याप्रमाणें आजच्या दिवसाला— तो मधें बेशुद्ध अवस्थेंत गेलेला विस्मृतीचा काळ जोडीत होता.

—तो त्याचा धागा जोडला गेला—आणि त्याची मनाची चाती फिरूं लागली. तो ताडकन उठला आणि आपल्या छातीवर हात ठेवून—धडधडत्या अंतःकरणानें आणि केविलवाण्या नजरेनें स्वतःला सावरीत तो आजूबाजूला पाहूं लागला.

—तोंच त्याच्यावर किती तरी डोळे रोखले गेले.

—आणि त्यांतील एकाला तर भान राहिलें नाहीं. त्यानें धाडकन् येऊन त्या शुद्धीवर आलेल्या वैमानिकाचा गळाच पकडला !

—बाकीच्यांनीं त्या गळा पकडणाराला बाजूला केलें.

"याच निमकहरामानें आमच्या इतिहासांतील किती तरी स्मृति बॉम्ब-फेकीनें नाहींशा केल्या आहेत ! आमचें जुनें चर्च याच हरामखोराच्या बॉबनें उध्वस्त झालें ! आणि किती तरी निरपराधी नागरिक यानें बळी घेतले !" वैमानिकाचा गळा पकडणारा तावातावानें—रक्तांकित नजरेनें बडबडत होता.

"जास्तींत जास्त हाल करा हरामखोराचे !—जे जे हालाचे प्रकार माहीत असतील—त्या त्या तऱ्हेनें छळा या पशूला—आणि तेवढे, तितक्या तऱ्हेचेहि हाल अपुरे पडले— तर जिवंत प्रतिभेचे सर्व कवि पकडून आणून त्यांना हालाच्या—छळाच्या नवीन नवीन कल्पना काढायला सांगा—आणि तितक्या तऱ्हेनें या बदमाषाला छळा !"

दुसऱ्या एकानें त्याचें सांत्वन करीत म्हटलें, "तो आतां आपला युद्ध-कैदी आहे ! युद्धाच्या नीतिनियमांप्रमाणें त्याला आपल्याला वागविलें पाहिजे ! भलतेंच काय भकतो आहेस !"

"युद्धाचे नीतिनियम ?—आणि या हरामखोराकरितां !" गळा पकडणारा किंचाळून म्हणाला. त्याचे आविर्भावहि जवळजवळ वेड्यासारखे होत होते.

"होय, युद्धाचे नीतिनियम माझ्या बाबतींत तुलाहि पाळले पाहिजेत !" वैमानिक कैदी अत्यंत शांततेनें म्हणाला.

"—आणि नाहीं पाळले तर काय करणार तूं आमचं ?"

"—मी काय करणार ? माझ्याबद्दलचा सूड घेण्याची जबाबदारी ज्यांच्यावर आहे ते काय करायचं तें करतील !" तो कैदी शांततेनें आतां हसूं लागला होता.

"काय करतील ?" गळा धरणाऱ्यानें खेकसून विचारलें.

पण त्याला उत्तर त्याच्याच साथीदारानें दिलें.

"काय करतील ? अरे आपला हा जसा युद्धकैदी—तसे आपलेहि कांहीं कैदी त्यांच्या ताब्यांत आहेतच कीं— विसर पडला तुला या गोष्टीचा ?"

चिडून गळा दाबायला निघालेला वीर हें वाक्य ऐकून एकाएकीं लुळा पडला– हतबल झाला!

" जगांत अस्तित्वांत आलेले नीतिनियम नीतीकरितां झालेले नाहींत—एकमेकांच्या स्वार्थाकरितां झाले आहेत! तुमच्या माणसांवर आम्हीं दया दाखवावी, त्यांचा छळ होऊं नये असें वाटत असेल तर आमचा—माझा छळ होतां कामा नये! कळलें काय राजेश्री?"

—त्या राजेश्रींना कळलेंहि आणि वळलेंहि. तो राजेश्री एकदम मऊ येऊन म्हणाला—कारण त्याच वेळेला त्याला आठवलें, कीं त्याचा एक अगदीं जीवश्चकंठश्च स्नेही-वैमानिक—बर्लिनच्या विमानहल्ल्यांत जिवंत पकडला गेला आहे.

त्या आठवणीनें त्याचे डोळे पाण्यानें भरून आले— आणि तो म्हणाला, " मग तुझी आम्हीं चांगली सेवाशुश्रूषा करायला पाहिजे तर?"

" अर्थात्!" तो वैमानिक कैदी अधिकाराच्या सुरांत म्हणाला, " मनी-आर्डरीसारखंच आहे हें! इथें पैसे भरले, कीं जसे दूरच्या आपल्या नातलगाला मिळतात त्याप्रमाणें माझी इथें तुम्ही सेवाशुश्रूषा कराल, तर ती तुमच्या कैद्यांना तिकडे पोंहोचेल." आणि तो केवढ्यांदा तरी हसला.

—तो गळा दाबणारा ब्रिटिश त्या जर्मन वैमानिकाची सेवाशुश्रूषा करायला लागला!

" आणि माझ्यावर मघांशी जो तूं रागावलास त्याचें तरी काय कारण? मला कुठें तुमच्या त्याच इमारती पाडायच्या होत्या? त्याच गतेतिहासाच्या स्मृति नष्ट करायच्या होत्या—चर्चेस् पाडायचीं होतीं? तुझा माझा धर्म काय निराळा आहे?"

"—पण पुन्हा संधि मिळाली आणि मीं माझ्या विमानांत बसून उड्डाण केलें तर– आज जें केलें तेंच पुन्हाहि करीन! पोटाचा धर्म आहे तो! आणि तूं तरी काय करशील बर्लिनवर गेलास तर?"

"—शक्य झालें तर अर्धेअधिक बर्लिन बेचिराख करीन!"

"—आणि मग मी लंडन सबंध नाहीं का बेचिराख करणार?"

"—पण मला कळत नाहीं, तुमच्या-आमच्या देशचं वैर कां असावं ?"

" मलाहि तेंच कळत नाहीं ! पण मला आपलं असं वाटतं कीं, हें वैर जें निर्माण झालं तें दोन्ही देशांतील शहाण्या समजल्या जाणाऱ्या मुत्सद्दयांमुळें !"

"—आणि तुमच्या-आमच्यासारख्या सैनिकांमुळें नव्हे काय ?"

"—पण सैनिक कोणी निर्माण केले ?"

" मुत्सद्दयांनीं !"

" कां ?"

" त्यांना संशोधक साथीदार मिळाले म्हणून ! देशांतील वैरं नाहींशीं करायचीं असतील तर मुत्सद्दी आणि संशोधक—क्रौर्याचे संशोधक जमीनदोस्त केले पाहिजेत !"

" पण आमच्या मुत्सद्दयांचा आणि संशोधकांचा आम्हांला अभिमान आहे !"

"—तसाच तो आम्हांलाहि आहे !"

"—मग त्यांची कत्तल कोण करणार ?"

" तुमचे मुत्सद्दी आम्ही मारूं—तुमचे संशोधक आम्ही मारूं—आणि त्यांच्याबद्दल आमचे तुम्ही मारा !"

" अशानें काय होईल ?"

" दोन्ही देशांतील माणसें—माणसं म्हणून आपले प्रश्न मिटवितील—गुण्यागोविंदानें नांदतील ! बोल रे, तुझं-माझं काय वैर आहे ? तूं गंमत म्हणून मला दारू दिलीस तर मी काय पिणार नाहीं-का माझ्याजवळ असली तरी मी तुला देणार नाहीं ? माणसें एकमेकांचा असा पाहुणचार करीत नाहींत वाटतें ?"

"—खरंच तुला दारू पाहिजे का ?"

" दे कीं ! साध्या साध्या माणसांतून हे मुत्सद्दी कसे निर्माण होतात कुणास ठाऊक ! आपण आपल्या भाईबंदांना इथून पुढें जपलं पाहिजे ! सध्यां त्यांतील जे चुकून मुत्सद्दी झाले असतील त्यांना आपला इलाज नाहीं—पण इथून पुढें आपण आपलीं माणसें जपलीं पाहिजेत ! इथून पुढें आपल्यांतला एखादा

मुत्सद्दी होतोसा वाटूं लागला, कीं सरळ आपण सगळ्यांनीं मिळून त्याला नांगराला जोडायला पाहिजे!”

दोघेहि हें बोलत असतांना खूप दारू प्याले.

नंतर थोड्या वेळांत दोघेहि झिंगले.

“—आतां इथून पुढें जगांत मुत्सद्दी निर्माण होऊंच द्यायचा नाहीं म्हणतोस? काय होईल अशानें?”

“—आहेत तेवढेच मुत्सद्दी आणि संशोधक जगाला काय त्रास द्यायचा तो देतील—ते संपले, कीं मग पुढें माणसांचेंच राज्य!”

“तें कसें काय? मग काय, कुणीं स्वतःला ब्रिटिश, जर्मन, फ्रेंच, इटालियन असं म्हणवून घेणार नाहींत?”

“अलबत घेतील! पण त्यांच्यांत वैर माजणार नाहीं! स्कॉट, वेल्स, गाल्सवर्दी, टॉलर, सुडरमान्, वाग्नर हीं जशीं आडनांवें आहेत तशींच तीं नांवें राहतील!......काय देश बेचिराख होत आहेत—जशी कांहीं नवीन पिकें लावण्यापूर्वीं नांगरट चालली आहे! या नांगरटींत एकमेकांचे कैदी सहानुभूतीनें वागविण्याचें आणि जपण्याचें कांहींच कारण नाहीं! नवीन पिकाला अडचण करणारीं हीं जुन्या वैराचीं डिखळें आपण उरूं देतां कामा नाहींत!......लढाईत सध्यां आपण एकमेकांना छळतों आहोंच ना?...... मारतोंच आहोंत ना? मग कैदी मारायला काय हरकत आहे? ते कैदी जर एकमेक मारीत सुटले तर एकदां जुन्या वैराचा कळस होऊन जाईल—जगांतली सर्व शस्त्रसामुग्री संपून जाईल—आणि सगळे मुत्सद्दी ठार होईपर्यंत ही शेवटची लढाई होईल—आणि मग खालीं फक्त माणसेंच राहतील—आणि माणसा-माणसांचें कुठें वैर आहे? देवानें माणसाला दिलेली बुद्धीची देणगीच शापासारखी ठरली आहे! या लढाया, हे विमानहल्ले हीं काय माणुसकीचीं लक्षणें आहेत? हें रिकाम्या बुद्धीनें माणसांचें साधलेलें वैर आहे.”

—नंतर किती तरी वेळ कोणी कांहींच बोललें नाहीं.

—सर्वत्र शांत होतें!

—पण थोड्याच वेळांत त्या वैमानिकाचा गळा दाबणारा ब्रिटिश म्हणाला, “मग त्या विचारांची मीच करूं का सुरवात?— दाबूं का तुझा गळा?”

"—पण मी कांहीं आतां जर्मन सैनिक नाहीं! तुझ्यासारखाच एक माणूस आहे! चल, वाटलें तर—तुला प्रिय असलेल्या—आणि माझ्या हातून बेचिराख झालेल्या इमारतीच्या विटा तुझ्या मनांत पुन्हा एकावर एक रचायच्या असतील तर मी येतों तुझ्या मदतीला—!"

यावर दोघांनीं एकमेकांकडे खुषींत पाहिलें. थोड्या वेळांत ते हसूं लागले. त्या हसण्याचा स्वर वाढतां वाढतां वाढूं लागला. कांहीं क्षणांत त्याला खिदळण्याचें स्वरूप आलें—ते एकमेकांच्या गळ्याला मिठी मारूं लागले—एकमेकांचे गालगुच्चे घेऊं लागले—

—दोघेहि मानवतेच्या प्रेमांत आले होते—आणि ते प्यालेली दारूहि त्यांना चढली होती.

पुन्हा त्या दोघांच्या हसण्याला ऊत आला.

"हॉऽ हॉऽ हॉऽऽ!!"

—मीं डोळे उघडले. सकाळ झाली होती. उन्हें पडून वाढत होतीं. मीं इतक्या उशिरापर्यंत कधींच झोपत नाहीं—तेव्हां मला कसें तरी भकास भकास वाटूं लागलें. हसण्याचा आवाज माझ्याहि कानाभोंवतीं अजून निनादत होता—कुठें आहेत ते सैनिक—मीं पडल्या पडल्याच आजूबाजूला पाहूं लागलों—

अजूनहि तशाच प्रकारच्या हसण्याचा आवाज मला ऐकूं येत होता—

मीं ताडकन् उठलों आणि तें हसणें कुठून ऐकूं येत आहे तें दार उघडून पाहूं लागलों—

—माझीं दोन मुलें प्रेमांत आलीं होतीं—आणि एकमेकांशीं खिदळत होतीं.

# एक टांगेवाला : : ८

कुणा तरी पाहुण्याची वाट पाहत मी दाराशीं उभा होतों. रस्त्यावरची रहदारी नेहमींप्रमाणेंच सुरू होती !

त्यांत कुणी धनुष्यापासून सुटलेल्या बाणाप्रमाणें निर्विकारपणानें नाकासमोर चालले होते. कांहीं स्वतःचे स्वतःशींच हसत चालले होते. कांहीं दुर्मुखलेले चालले होते. कांहीं ख्यालीखुशालींत चालले होते.

एक मनुष्य तर आपला आपल्याशींच इतक्या तन्मयतेनें हसत चालला होता, कीं व्यावहारिक आयुष्याचा पगडा जर माझ्या मनावर नसता, तर मीं त्या माणसाची ओळख नसतांनासुद्धां त्याच्या पाठीवर थाप मारून विचारलें असतें, कीं " अरे, इतका का खूष झाला आहेस तें मला तरी सांग ! "

पण मनावरच्या व्यावहारिकपणाच्या दडपणामुळें मीं त्याला विचारलें नाहीं– पण तें दडपण जरी माझ्या मनावर नसतें तरीसुद्धां कदाचित् मीं त्याला विचारलें नसतें !

कारण मीं इतक्या उत्साहानें त्याला विचारावें आणि त्याच्या आनंदाचें कारण अगदींच क्षुल्लक ठरावें! समजा, खोटा रुपया- बरेच दिवस चालवण्याचा प्रयत्न करूनहि न चाललेला— आजत्यानें चालविला असला— आणि त्याचा हा आनंद असला- तर तें ऐकून मला नाहीं आनंद वाटणार! उलट मला खिन्नता वाटली असती!

मीं त्या रहदारीवरून आपलें मन काढलें आणि माझ्या आवडीचा एक काव्यचरण गुणगुणत मी घरांत आलों.

इतक्यांत माझ्या दाराशीं एक टांगा थांबल्यासारखें मला वाटलें आणि मी कुतूहलानें पुन्हा बाहेर आलों.

टांगा माझ्या दाराशींच थांबला होता.

पण तो टांगा कांहीं माझे पाहुणे घेऊन आला नव्हता! टांगा हाकतां हाकतां त्या टांगेवाल्याचा चाबूक त्याच्या हातांतून गळून माझ्या दाराशीं पडला होता- आणि तो परत उचलून घेण्याकरितां तो टांगा माझ्या दाराशीं थांबला होता!

आशा-निराशेचा तो नाजुक धक्का मीं आनंदानें अनुभविला आणि पुन्हा घरांत आलों. अजून पाहुणे येणार का नाहीं हें निश्चित झालें नव्हतें. कदाचित् येतील, कदाचित् येणारहि नाहींत! आणखी जवळ जवळ अर्धा एक तास मनांत पाहुण्यांविषयीं विचारांचीं आंदोलनें चाललीं असतीं, तीं थांबविण्याकरितां मी माझा नेहमींचा व्यवसाय कांहीं आहे का तें पाहूं लागलों.

घरामध्ये कांहीं आवरासावर करायची असली- कांहीं इकडची वस्तु तिथें ठेवायची असली— तर अशा कांहीं घरगुती सुधारणांकरितां मी असा किरकोळ संधिकाळ खर्च करीत असतों!

पण आज तसें कांहींच कार्य मला सुचेना. आणि मग मात्र मला जरा पंचाईत वाटली.

हा मधला रिकामा वेळ कंटाळा न आणतां कसा काढायचा?

रिकामा वेळ! रिकामा वेळ!!

कित्येक लोकांना आनंदाचा वाटत असेल- पण मला स्वतःला अत्यंत त्रासदायक वाटतो! कारण जागें मन रिकामपणीं माझी फार भकास

मनःस्थिति निर्माण करतें! रोजच्या व्यवहाराचे आणि हिशेबाचे आडाखे बसलेले असतात. तेव्हां रिकाम्या वेळीं त्याचे कांहीं विचार सुचत नाहींत! मनाभोंवतीं कांहीं तरी भकास विचारवलयें निर्माण होतात!

पण, अरे बाप रे! आज कांहीं निराळाच चमत्कार झाला!

माझ्या बसायच्या खोलींत एक पुरुषभर उंचीचा आरसा शोभेकरितां म्हणून उभा केलेला आहे. मीं आजपर्यंत कित्येक वेळेला त्यांत पाहिलें असेल, मुलाबाळांनाहि त्यांचीं प्रतिबिंबें, त्यांना खेळविण्याकरितां मीं त्या आरशांत दाखविलीं असतील!

पण आज काय झालें, मी रिकामपणच्या थोड्याशा भकास मनःस्थितींत सहज खोलींतल्या खोलींत चालत होतों. आणि असा चालतां चालतां त्या आरशासमोर येऊन उभा राहिलों. आणि मग माझें सहज त्या आरशाकडे लक्ष गेलें. आणि समोर आरसा आहे असें मला वाटलेंच नाहीं.

—मीच माझ्याशीं समोरून बोलायला येत आहें असें मला वाटलें.

"कसं काय ठीक आहे ना?" असा समोरचा 'मी' मला विचारीत असल्याचा मला भास झाला.

अर्थात् माझ्या मनांत तेच विचार चालले होते हें निराळें सांगायला नकोच!

"कसें काय आहे?"

"ठीक आहे!"

"काय ठीक आहे?"

"आहे तें ठीक आहे!"

आरशांतील मी आणि खुद्द मी यांचीं हीं मानसिक प्रश्नोत्तरें होतीं.

अलीकडे मला एक मानसिक व्यथा जडली होती. त्यामुळें असे जे कांहीं रिकामे क्षण मला लाभत, ते मला अत्यंत त्रासदायक वाटत!

माझ्या मनाला एकच हुरहुर अशा वेळीं लागे.

माझें आयुष्य कालप्रवाहानें संपत आहे! आणि माझी इच्छा अशी होती, कीं मीं तें खर्च करावें म्हणून! माझ्या सध्यांच्या सुखी संसाराचा— अशा क्षणीं मला फार राग येत असे! कोंबडीं किंवा कबुतरें पाळावीं, किंवा जनावरें

पाळावीं तशीं मी माझ्या मिळकतीवर माझ्या घरांतलीं माणसें पाळतों आहे—पोसतों आहे—असें मला वाटे!

आयुष्य ज्योतीनें जळावें असें मला वाटत होतें— आणि माझें आयुष्य झिजतें आहे असें मला वाटत होतें! या कल्पनेंत मला चीड येई— म्हणून माझा असा रिकामा वेळ मला फार त्रासदायक वाटे! आणि याचें कारण मला स्पष्ट कळलें होतें— पण तें नाहींसें करणें माझ्या हातून होत नव्हतें! माझ्या घरांतल्या माणसांना मीं पाळीव जनावरांची उपमा दिली— अगदीं यथार्थत्वानें दिली, असें मी अजूनहि म्हणतों— कारण पाळलेले पक्षी किंवा जनावरें जशीं शोभेचीं होतात; तशीं घरचीं माणसें मी शोभादायक बनवीत होतों असें माझें मन मला खात होतें.

माझ्याजवळ पैसा आहे म्हणून मी त्यांच्या किती सुखसोयी पाहत होतों? माझी मलाच चीड येते त्याची. पण माझें हळवें मन— त्या सुखसोयी बंद करण्याइतकें खंबीर होत नव्हतें!

जीवनाला हवें तें योग्य वेळीं मिळणें हें निराळें—आणि हवेंसें वाटतें तें पुरवीत बसणें यांत अंतर नाहीं का? जीवनाला हवें तें पुरविणें हें कर्तव्य आहे— त्यानें माणसें निर्माण होतात— आणि हवेंसें वाटतें तें पुरवीत बसण्यानें माणसांचीं पाळीव जनावरें निर्माण होतात!

माझ्या आजूबाजूला सुखी संसारच आहेत— तिथेंहि मी निरीक्षणाकरितां पाहूं लागलों, कीं माझी हीच चीड आणखी जास्त वाढते! माझ्यासकट तीं सर्व घरें म्हणजे पाळीव माणसांचे पिंजरे वाटतात मला!

सार्वजनिक कार्य, क्रांति हीं हत्यारें आपलीं नव्हेत; पण माणसांचे पाळीव पशु निर्माण न करणें तरी आपल्या हातीं नाहीं का?

निदान आपण एवढें जरी केलें— माणसें, माणसें म्हणूनच वाढविलीं तरी केवढें सामाजिक कार्य आहे! आपलीं मुलें— आपलीं माणसें किती तैनातीनें संभाळायचीं आणि पोसायचीं, किती लुळीं बनवायचीं?

त्यामुळें होतें काय— एखाद्या साध्या प्रसंगाचा छराहि— हीं मानवी पांखरें घायाळ करूं शकतो!

तुम्ही म्हणाल, उदाहरण द्या! मी म्हणतों, उदाहरण देण्याचें कारणच नाहीं! जो म्हणून स्वतःला खाऊन-पिऊन सुखी म्हणवतो त्यानें मीं आतां वर लिहिलेल्या विचारानें आपल्या संसाराकडे पाहावें—

घरांत एखादा विंचू निघाला तर पहिल्यांदा त्याला मारण्यासाठीं धावण्याचे अगोदर आपलीं पोरें-बाळें लांब करण्याचें आपण पहिलें काम काम करूं— त्या संधींत तो विंचू कदाचित् पळूनहि जाईल! उदाहरण आपल्याला चूक वाटेल कदाचित्—पण त्यांतील भावना लक्षांत घ्या.

प्रसंगापासून आपण आपलीं माणसें बाजूला करीत असतों. ज्या प्रसंगानें धैर्य निर्माण करायचें, त्या प्रसंगानें आपण आपल्या माणसांत भीति निर्माण करीत असतों!— हें केलें नाहीं तरी आपण केवढें तरी सामाजिक कार्य केल्यासारखें होईल?

—थांबा, माझी विचारशृंखला पुन्हा तुटलीच. माझा बाब्या, हा रडत आला पाहा.

"बाबा, मीं तुम्हांला सतरांदा सांगितलं आज सकाळपासून, मला चॉकोलेट आणा म्हणून. नाहीं ना आणलंत? हं-हं-हं—" लागली स्वारी रडायला.

मला तें रडणें सहन होईना. मीं लगेच खिशांतला रुपया काढून गड्या-जवळ दिला आणि त्याला माझ्या बाब्याला चॉकोलेट आणून द्यायला सांगितलें!

कोणीहि रडलें, कीं त्या रडण्यामुळें त्याचा 'हक्क' निर्माण झाल्यासारखा आम्हांला वाटतो. कारण जीविताच्या आमच्या कल्पनाच कुठं नक्की आहेत?

खिशाला सवड आहे—पोरेंबाळें—बायकामुलें रडण्याच्या हक्कानें मागत आहेत— द्या त्यांना त्यांच्या मागण्या!

नको म्हणण्याचें धैर्य कुठें आहे आमच्याजवळ?

बाब्या आणि गडी निघून गेला. मी पुन्हा बाहेरच्या गॅलरींत येऊन फेऱ्या मारूं लागलों. पुन्हा एक टांगा येतांना मला दिसला. टांगा भरलेला होता. मला वाटलें, माझे पाहुणे आले म्हणून.

पण टांगा वेगानें येत नव्हता. संथपणें येत होता.

अखेर टांगा माझ्या दारासमोर आला. मीं कौतुकानें त्या टांग्याकडे पाहिलें आणि हसलों. माझ्या हसण्याचें कारण वरील विचारमालिकेशीं अगदींच निराळें होतें.

माझ्या हसण्यामुळें तो टांगेवाला थोडा खजील झाला आणि त्यानें आपला टांगा माझ्या दाराशीं थांबविला.

"दादा– टांगा रिकामा आहे हवा असला तर!"

"छेः, मला टांगा नको आहे!"

तो टांगेवाला माझ्या ओळखीचा होता.

"नाहीं– नको आहे मला टांगा– तूं जा आपला!"

त्या टांगेवाल्यानें टांगा थांबविला. तो टांग्यांतून खालीं उतरला–घोड्या-पुढें त्यानें गवताच्या चार काड्या टाकल्या आणि तो माझ्या गॅलरींत आला.

"काय रे कोंड्या, खरंच मला टांगा नकोय्! तूं कशाला थांबलास विनाकारण?"

कोंड्या लाजून हसत म्हणाला, "तसं नव्हं धनी. टांग्यांत बसलीया ती माझी बायकू हाय! आपण तिलाहि वळखतांच धनी!"

"होय!"

"तवां, मी असं म्हनतों– आपल्याला हवा असल टांगा, तर रिकामाच हाये!"

मीं केवळ त्याला खिजविण्याकरितां म्हटलें, "अरे, पण मी तुमच्या सुखाच्या आड कशाला येऊं मला टांगा हवा असला तरी? आतां येईल दुसरा एखादा टांगा!"

"हां– म्हनूनच मी खालीं उतरून– तुमांला समजून सांगाया आलों!"

"अरे, त्यांत समजून काय सांगायचं? घरचा टांगा आहे– एखादवेळेला आपल्या बायकोला घेऊन फिरायला गेलास तर बिघडलं काय त्यांत? मला तर उलटा आनंद झाला तूं आपल्या बायकोशीं इतक्या प्रेमळपणानं वागतोस हें पाहून!"

पण माझें हें वाक्य ऐकून कोंडीबानें आपल्या कपाळाला हात लावला आणि हळहळत उद्गारला, "धनी, हल्लीं धंदा हाय कुटं? आज दुपारीं दोन वाजतां टांगा जोडला; पांच वाजेपर्यंत या चौकावर त्या चौकावर अशा फेऱ्या घातल्या– पण भाडं म्हणून मिळेना. मग मनांत इचार आला– येवींतेवीं रिकामाच टांगा हिंडवायूचा, तर बायकूला तरी हिंडवून आणूं. म्हणून टांगा घरावरनं घेतला—आणि निघालों हिंडाया—स्वारी भेटली, कीं ती उतरल आणि जाईल पायीं चालत—!"

मला तो टांगेवाला केवढा तरी तत्त्वज्ञानी वाटला !

सवड असेल तेव्हां सुख सोबतीला घ्यायचें आणि जीवनाचें कार्य आलें, कीं सुखाची सोबत तिथेंच सोडून– जीवनकार्याचें सारथ्य करायचें !

किती खेळीमेळीचें आणि धडधाकट तत्त्वज्ञान आहे हें ?

"आणि तुझीं मुलंबाळं काय करताहेत रे आतां ?—तीं नाहीं का रडायला लागलीं– तुम्ही दोघेंच बाहेर पडलेले पाहून ?"

"न्हाइ बा! पोरं खेळताहेत गोट्या रस्त्यावर! तीं कसचीं रुसत्यात-फुगत्यात! उलट आम्ही गेल्यामुळं खूप मनमोकळं खेळतां-हुदडतां यइल म्हनून आनंद झाला असेल त्यांना! लई हूड आन् दांडगीं हैती कार्टीं!"

"त्यांना तुमची माया आणि लळा नाहीं वाटत ?"

"असं कसं व्हईल! दिवसभर ही त्यांना मारपीट करीत असते. तीं पोरं बी बोंबलत असत्यात! पर निजायच्या वक्ताला त्या वासरांखिलारांवरून हात फिरवल्याबिगर मला बी शांत झोप येत नाहीं– अन् तीं बी झोपत नाहीं! मग काय टांगा हवाय् ना धनी!" कोंड्या अजीजीनें म्हणाला.

"कोंड्या, मला खरंच टांगा नको आहे आतां– मीं सहज तुझी गंमत केली. उद्यां मात्र सकाळीं टांगा जोडलास तर घेऊन ये–मला पाहिजे आहे!"

कोंड्या मला सलाम करून परत आपल्या टांग्याशीं गेला. घोड्याच्या पाठीवर त्यानं थाप मारून राहिलेल्या गवताच्या चार काड्या पुन्हा टांग्यांत टाकल्या. त्याची बायको माझ्याकडे लाजून पाहत होती.

टांगा तिथून हलेपर्यंत मीं तिथें उभें राह्यचें ठरविलें होतें.

कोंड्याच्या बायकोनें अखेर माझी दृष्टि टाळण्याकरितां दुसरीकडेच पाहायला सुरुवात केली.

कोंड्यानें टांगा हाकलला.

मला वाटलें, कोंड्या तत्त्वज्ञान अजाणतां जगत आहे. आणि आम्ही तत्त्वज्ञान शोधीत आहोंत ! विचार करीत आहोंत !

माझ्या मनांत आलें, कीं मी जर टांगेवाला असतों तर असाच वागलों असतों का ? कदाचित् वागलोंहि असतों !

पण त्याच्या माझ्यांत एकच फरक पडला असता !

कोंड्याला स्वारी मिळतांच त्यानें आपल्या बायकोला तिथेंच उतरविलें असतें !

आणि मीं ?

मला वाटतें तसेंच केलें असतें !

पण—

—पण आणखी एक जास्त केलें असतें.

बायकोला उतरविल्यानंतर तिला घरीं जाण्याकरितां दुसरा एक टांगा ठरवून दिला असता. आणि तिची तशी सोय लागल्यानंतर मग मी माझें भाडें घेऊन गेलों असतों !

---

# दीपावलि : : १

दिवाळी जसजशी जवळ येत चालली होती, तसतसा चितोपंतांचा चेहरा जास्त जास्त चिंताक्रांत दिसूं लागला. चितोपंतांचें उपजीविकेचें साधन व्यापारउदीम हें होतें. ते अत्यंत मनमिळाऊ स्वभावाचे होते त्यामुळें त्यांचा व्यापारउदीम बरा चालत असे.

व्यापाराप्रमाणेंच ते घरींहि अत्यंत सुखी होते. त्यांना तीन मुलगे आणि एक मुलगी अशीं अपत्यें होतीं; आणि थोड्यांत फार करून दाखविणारी अशी सुग्रण पत्नी त्यांना मिळाली होती. तिच्या तोंडावर एक प्रकारचें गंभीर पण सौम्य हास्य नेहमींच विलसत असे!

घरांत पोरेंबाळें आपल्या बालस्वभावानुरूप अत्यंत किलबिलाट करीत; पण हिची कधीं हाकाटी नसायची. त्यामुळें त्या पोरांचा चालणारा गोड किलबिलाट त्यांना अत्यंत सुखमय वाटे. नाहीं तर पोरें ओरडतात म्हणून त्यांची आई त्यांच्यावर ओरडते; आणि नवख्या प्रेक्षकाला आई गोंगाट करून

मुळें त्याला साथ करीत आहेत असें वाटूं लागतें. असा गैरसमज तिच्या बाबतींत शेजाऱ्यापाजाऱ्यांचा कधीं झाला नाहीं!

आहे त्याच्यांत सुख निर्माण करायचें हा तिचा देहस्वभाव होता! चिंतोपंतांच्याहि स्वभावाचा तोच नमुना होता. त्यामुळें तें आदर्श सुखी कुटुंब होतें.

आणि आपल्या या थोड्याशा समाधानकारक परिस्थितींतसुद्धां अडी-अडचणींतल्या माणसाला कांहीं हातभार लावावा असा चिंतोपंतांचा स्वभाव असे. पण या मनोवृत्तीचा फायदा घेणारे कांहीं 'धंदेवाईक' असतात. ते अत्यंत 'गोड-बोले' असतात. स्वतःबद्दल सहानुभूति वाटण्याकरितां ते कोणाबद्दलहि आपुलकी दाखवायला तयार असतात. ती आपुलकी कित्येक वेळेला अत्यंत मोहक आणि फसवी असते!

* * *

अशाच एका आपुलकीला चिंतोपंत बळी पडले होते. त्यांच्या एका स्नेह्यानें एका बँकेंतून कांहीं कर्ज काढलें होतें. त्याचे कांहीं हप्ते त्यानें दिले होते आणि कांहीं द्यावयाचे राहिले होते.

आणि अशा व्यवहारांत जी एक थाप नेहमीं निर्माण करण्यांत येते तीच थाप चिंतोपंतांच्या स्नेह्यांनीं चिंतोपंतांस मारली. "एवढे हप्ते एकदम भरले कीं बँकेंतून मला पुनः मोठें कर्ज काढतां येईल. माझीहि अडचण भागेल— व कर्ज हातीं येतांच आपली रक्कम परत करतों!"

बिचारे चिंतोपंत या थापेस बळी पडले. आणि तेंहि बरोबरच आहे. या आधुनिक व्यवहारांत मनुष्य केव्हां तरी एकदां पोळून निघतोच. माणसाला जशी केव्हां तरी एकदां खरूज येऊन जाते तशीच ही एकदां व्यवहाराची खरूज येऊन जाते.

पुढच्या तारखेचा चेक आज लिहून देऊन उसनवारी करणें—हीं असलीं हप्त्याचीं कारणें सांगणें—या सापळ्यांत व्यवहारी माणसाचा केव्हां तरी एकदां हात अडकतोच!

चिंतामणरावांनीं आपल्या स्नेह्याला मदत केली आणि केवळ चिंतामण-रावांनीं अशा व्यवहारांत पुन्हा फसूं नये याच सदिच्छेनें प्रेरित होऊन त्या

स्नेह्यांनीं चिंतामणरावांची रक्कम परत केली नाहीं. आणि त्यामुळें चिंतामण-रावांचा व्यवहार अडला. आणि स्वतःच्या जीवनांत काटकसर करून त्यांना त्या पैशांची व्यवस्था करणें भाग होतें. कारण चिंतोपंतांचा व्यापारहि कांहीं फारसा मोठा नव्हता. पोटापुरतेंच ते मिळवीत होते आणि त्याचें नांव व्यापार हें होतें. तेव्हां त्यांच्या जीवनव्यवहारांत 'कोलाहल' माजविण्यास तो तेवढा धक्का पुरेसा होता.

आणि आलेल्या अडचणींवरहि धंदा करणाऱ्या कांहीं मनोवृत्ति असतात. आपल्या अडचणी आळवून ते इतकी मदत गोळा करतात, कीं 'अडचण' हें त्यांचें त्या वेळेपुरतें भाग्य ठरतें !

पण चिंतोपंतांनीं आपल्याला बसलेल्या या 'ठोकरी'चा घराशिवाय कोठेंहि उद्गार काढला नाहीं !

* * *

दिवाळी जवळ आली होती. घरोघरीं दिवाळीची तयारी होऊं लागली होती. घरांना रंगसफेती चढूं लागली होती.

शेजारपाजारचे बाळगोपाळ येत्या दिवाळीच्या उत्साहपूर्ण आनंदानें घुमूं लागले होते. दरवर्षी चिंतामणरावांच्या घरींहि अशी ही हालचाल सुरू व्हायची. पण या वर्षी चिंतोपंतांना तें शक्य नव्हतें.

चिंतामणरावांच्या पत्नीला हें सारें माहीत होतें. पण त्यामुळें ती खजील झाली नव्हती. उलट अडलेला डाव हुरूपानें खेळावा त्याप्रमाणें तिला एक प्रकारची गंमत वाटत होती.

तिला काळजी एकच पडली होती.

मुलांना हें कसें समजावून सांगायचें ?

स्वतः रागावून—त्रागा, संताप करून-- चिल्यापिल्यांच्या भावना दडपून टाकून त्यांची सर्कस करणें तिला आवडत नसे.

'मुलांना काय सांगायचें ?' हाच फक्त तिच्यापुढें प्रश्न पडला होता.

मुलाबाळांनीं आज एक-दोन दिवसांत सुरुवात केलीच होती.

" आई आपल्याकडे फराळाचं केव्हां करायचं ? "

" आई, या दिवाळीला मला कपडे नवीन करायचे बरं का ! "

ती आई हसे. त्या प्रश्नांचीं कशीं उत्तरें द्यावयाचीं हें तिला उलगडत नव्हतें. या प्रश्नांवर मग ती आपल्या मुलांनाच प्रश्न विचारी.

" आपल्याकडे फराळाचं केव्हां बरं करायचं बाळांनो ? "

" लवकर कर " मुलं-बाळं एकमतानें सांगत.

आणि मग ती आपल्या लहानग्यांचा आर्द्रतेनें मुका घेई आणि सांगे, " बरं हं ! "

पण एवढ्यावर कांहीं क्षण निघतील—दिवस कसे निघायचे ?

एक दिवस मुलें अगदीं हातघाईला आलीं आणि मग तिनें आपल्या मुलांना सांगितलें, " बाळांनो, घरांत अजून सामान यायचं आहे—आल्या-बरोबर करतें हं फराळाचं ! "

" पण सामानाला किती उशीर ग या वर्षी ? "

" हें मला काय बरं विचारतोस बाळ ! "

" मग कुणाला विचारूं ? "

"—आपल्या घरात सामान कोण बरं आणतं ? "

" आपले अण्णा ! "

" मग त्यांना विचारा. घरांत सामान आलं, कीं मी बिलकुल आळस करायची नाहीं ! करीन का मी कधीं आळस ? "

सर्व मुलांनीं नकारात्मक माना हलविल्या; आणि सर्व मुलें आपल्या आईच्या अंगाशीं बिलगलीं. कुणी मांडीवर बसलीं. कुणी खांद्यांशीं बिलगलीं. कुणी पाठीवर रेललीं.

दिवाळीचा दिवस लवकर आणण्याकरितांच मला वाटतें सूर्यसुद्धां त्या दिवशीं जरा घाईनेंच मावळला.

—आणि चिंतोपंतांचीं मुलें आपल्या आईचें अंग कुस्करीत दरवाजाकडे टक लावून पाहत बसलीं होतीं. कारण त्यांचें ' अण्णा ' आल्यानंतर आपल्या घरांत दिवाळीचें सामान केव्हां यायचें, हा त्यांचा प्रश्न सुटणार होता.

मुलें वाट पाहत होतीं.

आणि त्यांचे अण्णा—चिंतोपंत घरीं यायला रेंगाळत होते.

—इतक्यांत आईनें एक केवढी तरी जांभई दिली. मुलांना तिनें आपल्या अंगापासून हलक्या हातानें दूर केलें आणि ती स्वैंपाकघरांत निघून गेली.

मुलांनीं एकदां आपल्या जात्या आईकडे पाहिलें आणि तीं सर्वजण दरवाजांत जाऊन उभीं राहिलीं.

त्यांतील जें अगदीं मोठें मूल होतें तें रस्त्यांत जाऊन टेहळणी करूं लागलें.

सर्व रस्त्यांतून आल्या गेल्या माणसांच्या तोंडीं दिवाळी कुजबुजत होती.

इतक्यांत त्या रस्त्यावरच्या मुलानें घराकडे धूम ठोकली आणि आपल्या भावंडांना हसत हसत टाळ्या पिटीत सांगितलें—

" आले !—अण्णा आले ! "

* * *

चिंतोपंत आल्या परिस्थितीला खजिलपणानें हसत मंदमंद पावलांनीं घरीं येत होते.

त्यांनीं मनांत ठरविलें होतें, दिवाळी होऊन जाईपर्यंत घरांत गंभीरपणानें वागायचें. म्हणजे पोरंबाळं गप्प बसतील. कुणाला तरी विनाकारणच दटावायचें. कशावरून तरी विनाकारणच रागवावयाचें अशा विचारांत ' अण्णा ' घरीं येत होते.

पण दरवाजांत येतांच त्यांचें हें मनोराज्य पार ढासळून पडलें. एखाद्या फांदीला जशीं फळें ओथंबावींत त्यांप्रमाणें अण्णांचीं सर्व मुलें त्यांना दाराशीं येतांच एकदम बिलगलीं. कुणी हसत होतीं. कुणी अण्णांच्या नजरेकडे टक लावून केविलवाणें पण गमतीदार पाहत होतीं.

" अरे, हें काय आज चालवलं आहांत तुम्ही पोरट्यांनो ! " पायांतील वहाणा काढून ठेवीत अण्णा आपल्या मुलांना म्हणाले.

पोरं थोडीं बाजूला झालीं. अण्णांनीं आपल्या अंगांतील कपडे काढून ठेवले आणि ते खालीं बसले.

झटकन् पोरं जाऊन त्यांना बिलगलीं. अण्णा मुलांकडे पाहत होते. मुलें अण्णांकडे पाहत होतीं. कोणी कोणाशींच बोलत नव्हतें !

पण याची चाहूल आंत लागली. अनसूयाबाई—चिंतोपंतांची बायको तिथें येऊन उभी राहिली.

दिवे लावायची वेळ होऊन गेली होती. पण कांहीं तरी भानांत अनुसयाबाईच्या तें लक्षांत आलें नाहीं.

इतक्यांत अण्णांना कधीं नव्हता तो खोकला आला. तो कृत्रिम होता. त्या खोकल्यानें अनसूयाबाईंना हसूं आलें–आणि त्यांच्या लक्षांत आलें, कीं वेळ होऊन गेली तरी आपल्या घरांतील दिवा अजून लावायचा राहिलेला आहे!

शेजारपाजारच्या घरांतून दीप प्रज्वलित झाले होते–रस्त्यावरचे दिवे लागले होते. आणि फुलांचा परिमल आजूबाजूला सुटावा त्याप्रमाणें या अंवतीं भंवतींच्या प्रकाशाचा मंद सुगंध स्पष्ट-अस्पष्ट किरणरजांनीं चिंतोपंतांच्या घरांत घुसलेला होता. त्यामुळें सकाळीं धुकें पसरलेलें असतांना जशी गांवांतून फिरतांना गंमत वाटते, त्याप्रमाणें त्या घरांत त्या वेळीं प्रकाशानें धुकें पडल्यासारखें वाटत होतें.

अनसूयाबाईंनीं चटकन दिवा लावला.

त्या स्वच्छ प्रकाशांत पुन्हा एकदां त्या सबंध कुटुंबानें एकमेकांकडे पाहिलें.

अनसूयाबाईंनीं एकवार हसतमुखानें आपल्या पतीकडे पाहिलें आणि त्या घरांत जाऊं लागल्या.

तोंच अण्णांनीं त्यांना विचारलें, “आज हें काय आहे?” अण्णा आपल्या मुलांच्या पाठीवरून हात फिरवीत होते.

नुसत्या हाताच्या विक्षेपानें अनसूयाबाई उत्तरल्या,

“मला काय माहीत?”

आणि नंतर त्यांनीं नजरेच्या खुणेंत, ‘मुलांनाच विचारा काय तें!’ असें सुचविलें. आणि त्याच नजरेंत त्यांना भिंतीवर कुठें तरी एक कोळिष्टक लोंबतांना दिसलें— उंचावर होतें तें— आपले पाय थोडे उंचावून त्या तें कोळिष्टक झाडूं लागल्या.

* * *

घरांतील मोठ्या माणसांच्या वागणुकीचेंहि एक प्रकारचें घरांत वातावरण असतें, चिंतोपंतांचा गंभीर आविर्भाव पाहून त्यांचीं मुलें त्यांच्याजवळ

लाडिकतेनें जवळ जाऊं शकलीं. पण त्यांना कांहीं विचारूं शकलीं नाहींत. हें चिंतोपंतांनींहि मनांत जाणलें आणि ती मुलाबाळांची मानसिक कुचंबणा पाहून त्यांचें वात्सल्य उतास जाऊं लागलें. त्यांनीं त्यांच्या मांडीच्या आसनावर अधिष्ठित झालेल्या आपल्या एका मुलाच्या पाठीवर चुचकारल्या-प्रमाणें थाप मारली आणि त्याला हलकेंच विचारलें,

" काय रे, काय पाहिजे तुला ?"

तें मूल अगदींच चारपांच वर्षांचें होतें. त्यानें एक हात अण्णांच्या सदऱ्याच्या गुंडीला घातला आणि तें बोलण्याचा प्रयत्न करूं लागलें. त्याला खरें विचारावयाचें होतें—

" अण्णा, मला फटाके केव्हां आणणार ?"

—आणि त्यानें विचारलें काय ?

अण्णांच्या कमरेला मिठी मारीत त्यानें विचारलें, " अण्णा, मी तुमचा ना ?"

चटकन वीज चमकावी आणि नाहींशी व्हावी त्याप्रमाणें त्या प्रश्नानें अण्णांच्या डोळ्यांत एक अस्पष्ट आंसवांची रेषा चमकली आणि लगेच अंतर्धान पावली !

इतक्यांत दुसऱ्यानें त्याला न विचारतांच म्हटलें, " आणि अण्णा, मी नाहीं का तुमचा ?"

तिसरा म्हणाला, " —आणि अण्णा माझे नाहींत वाटतं ?"

या तीन मुलांच्या तीन तऱ्हा झाल्या. पण अण्णांचें जें एक एकुलतें एक कन्यारत्न होतें तें यानंतर किलबिलाटानें अण्णांच्या गळ्यांतच पडलें—आणि तिच्या अशा करण्याला तिथें जवळच बसलेल्या ज्या एका भावाच्या बसण्यानें तिला अडथळा होत होता त्याला आपल्या हालचालीनें बाजूला सारीत ती म्हणाली, " अंऽहं ! अण्णा एकटे माझे आहेत !"

आणि या वाक्यानें तीं बालमनें मोकळीं झालीं आणि त्यांच्यांत वाद सुरू झाला कीं,

" अण्णा कुणाचे— ?"

अण्णा ती सर्व गंमत अनुभवीत होते आणि नंतर थोड्या वेळानें त्यांनीं प्रत्येकाला विचारलें,

" हं, या दिवाळीला कुणाला काय काय पाहिजे बोला ! "

आणि मग काय, ज्या मागण्या सुरू झाल्या त्या थांबेनातच ! अण्णा प्रत्येक मागणीला 'हो-हो' करीत होते. अखेरशेवटीं सर्व मागण्या संपल्या. अण्णांनीं ह्या सर्व मागण्या ध्यानांत ठेवल्या आणि " आतां हें सर्व केव्हां आणणार " हा प्रश्न मुलांकडून यायच्या आंत ते म्हणाले,

" संध्याकाळचे पाय कुणी कुणी धुतले ? देवाला नमस्कार कुणी कुणी केले ? "

" अरे, तें राहिलंच कीं ! " अशा उद्गाराचे आश्चर्यभाव प्रत्येक मुलानें आपल्या तोंडावर दाखविले. आणि आपण मागितलेलें सर्व जर आपल्याला पाहिजे असेल, तर आतां आपल्या वागणुकींत कांहीं चुकतां कामा नये असा एक व्यावहारिक विचार त्या सर्व बालमनांत आला आणि प्रत्येकजण गंभीर चेहरा करून हातपाय धुवायला आणि देवाला नमस्कार करायला चालूं लागला !

अशा तऱ्हेनें सर्व मुलें तेथून गेल्यानंतर हवेंत थंडी असूनसुद्धां अण्णांना उकडूं लागलें. त्यांनीं आपल्या अंगांतला सदरा काढून टाकला आणि ते घरांतल्या घरांत फिरूं लागले.

तोंच त्यांची चिमुकली कन्यका गंभीरपणानें तिथें आली. अण्णांचें तिच्याकडे लक्ष गेलें. ती कन्यका गालांतल्या गालांत हसली. आणि जास्तच गंभीर होण्याकरितां तिनें आपल्या पायघोळ परकराचा ओचा घातला आणि नंतर एका हातानें आपल्या कपाळावर आलेलीं केसाग्रें बाजूला सारीत ती चिमुरडी खालीं वाकून म्हणाली.

" अण्णा, नमस्कार करते हं ! "

त्या बालनमस्काराचा स्वीकार करतांना अण्णांना काय वाटलें तें मी सांगत नाहीं– तें एखाद्या बापाला विचारा !

अण्णांनीं कांहीं तरी आवेगानें त्या नमस्कारानंतर त्या चिमुरडीला उचलून खांद्यावर घेतलें आणि ते बाहेर ओटीवर आले.

* * *

इतक्यांत त्यांना कांहीं तरी एक कल्पना सुचली.

त्यांनीं आपल्या मुलीकडे एकदां टक लावून पाहिलें आणि म्हटलें, 'मथे–'

टाळ्या वाजवीत मथी म्हणाली, "काय, अण्णा?"

"तुला एक गंमत सांगूं!"

"हं सांगा—"

"पण कुणाला सांगायची नाहीं!"

"अं हं! कुण्णाला, कुण्णाला नाहीं सांगणार!"

"अगदीं तुझ्या आईलासुद्धां?"

"अं हं! अगदीं आईलासुद्धां सांगणार नाहीं!"

तिला वाटलें आईलासुद्धां जी गंमत सांगायची नाहीं ती किती मजेदार असेल. आणि मग तिनेंच घाई चालविली, "अण्णा, सांगा ना लवकर!"

अश्रुभरल्या डोळ्यांनीं अण्णांनीं मथीला गंमत सांगितली. ती गंमत ऐकल्या-नंतर मथीनें एकदां गंभीरपणानें अण्णांकडे पाहिलें आणि नंतर ती लगेच खुदकन् हसली. आणि अण्णांच्या खांद्यावरून लगबगीनें खालीं उतरली.

—आणि वाऱ्यासारखी स्वैंपाकघरांत धावत जाण्यापूर्वीं तिनें आपल्या अण्णांना बजावलें,

"–पण अगदीं नक्की हं!"

अण्णांनीं मान डोलवली. आणि मथी वाऱ्यासारखी स्वैंपाकघरांत निघून गेली!

धोतराच्या सोग्यानें अण्णांनीं आपले डोळे पुसले. तोंच त्यांचा मुलगा अनंता तिथें आला.

* * *

मथीला अण्णांनीं कांहीं तरी एक गंमत सांगितली आहे. पण ती कुण्णा-कुण्णाला—अगदीं आईलासुद्धां सांगायची नाहीं–इतकी ती महत्त्वाची आहे, —ही बातमी घरांत उधळली होती.

अनंतानें कांहीं न बोलतांच अण्णांना संध्याकाळचा नित्यनियमाचा नमस्कार केला. अनंता हा चिंतामणरावांचा सर्वांत मोठा मुलगा. सुमारें तेरा वर्षांचा.

त्यानें अण्णांना नमस्कार केला. अण्णांची पुन्हा शांतपणानें शतपावली चालू झाली. अनंता कांहीं न बोलतांच अण्णांच्या तालावर शतपावली करूं लागला. एकदोन फेऱ्या झाल्यानंतर अण्णा ओटीवर गेले तसा अनंताहि त्यांच्या मागोमाग गेला.

" अण्णा, मथीला कसली गंमत सांगितलीत ? "

" ती सांगायची नाहीं कुणाला ! "

" मग मला सांगतां— दुसरी एखादी गंमत ? "

" कुणाला सांगणार नाहींस ? "

" अं हं ! "

" अगदीं आपल्या आईलासुद्धां ? "

" आईलाच काय—पण देवालासुद्धां सांगणार नाहीं ! " अनंता थोडी आपल्या वयाची चुणूक दाखविण्याकरितां म्हणाला.

आणि मग अण्णांनीं त्याला गंमत सांगितली. गंमत ऐकतांच तो एकदम गंभीर झाला. दोघेहि एकमेकांकडे पाहून एकदां हसले.

" पण हें नक्की हं ? "

असें आपल्या वडिलांना एकदां विचारून अनंताहि स्वैंपाकघरांत निघून गेला.

अनसूयाबाई देवघरांत समई लावून बसल्या होत्या, तिथें अनंता आला. आईला बिलगून बसला आणि समईच्या ज्योतीला आलेला कोळी हलक्या हातानें एका काडीनें झाडीत अनंता म्हणाला, " मलाहि अण्णांनीं एक निराळीच गंमत सांगितली आहे ! "

अनंताच्या खालचा नंबर श्रीपादचा.

आपल्या दोघा भावंडांना अण्णांनीं दोन निरनिराळ्या गमती सांगितल्या आणि आपल्यालाच सांगणार नाहींत कीं काय, या अहंभावानें तोहि उठला आणि आपल्या इतर भावांकडे आणि आईकडे पाहत तोऱ्यानें म्हणाला,

" मी येतों अण्णांना गंमत विचारून—"

आतां श्रीपादच्या खालचा नंबर भालचंद्राचा. या दोघांनाच फक्त गमती सांगायच्या राहिल्या होत्या.

श्रीपाद अण्णांना गंमत विचारायला जाणार तोंच भालचंद्रानें त्याला अडविलें आणि त्याचा हात धरून तो म्हणाला, “ मी येतों अगोदर अण्णांना गंमत विचारून ! ”

“ नाहीं. मी जाणार, अगोदर.” श्रीपाद हट्टानें म्हणाला.

अखेर दोघांची तिथेंच झुंजायची वेळ आली.

अनसूयाबाईनीं शांतपणानें सांगितलें, “ श्री, तूं भालचंद्रापेक्षां मोठा आहेस ना? तो तुझ्यापेक्षां लहान आहे ना—मग त्याला येऊं दे अगोदर जाऊन!”

हे शब्द संपायच्या आंतच भालचंद्र बाहेर पळाला आणि श्री आईच्या पाठीवर प्रेमाच्या चापट्या मारीत म्हणाला, “ माझ्यापेक्षां भालूच आईचा लाडका आहे जसा कांहीं ! ”

अनसूयाबाईनीं मागें वळून श्रीकडे पाहिलें आणि विचारलें,

“ श्री, अंऽ—माझं कोण लाडकं आहे सगळ्यांत ? ”

श्री लाजून म्हणाला, “ मीच ! पण कधीं कधीं वाटतं तूं मला फसवतें आहेस कीं काय ? ”

“ अरे लबाडा ! श्री—”

आणि पुढें कांहीं नाहीं. समईच्या संथ प्रकाशाप्रमाणें सर्व बसलीं.

तोंच भालचंद्र अण्णांकडून गंमत ऐकून आला. अर्थात् आतांपर्यंतच्या गमतीप्रमाणें तीहि गंमत कोणाला सांगायची नव्हती.

आतां शेवटचा वीर श्रीपादच राहिला होता. आतां राह्यलीसायली सर्व गंमत आपल्या एकट्यालाच मिळणार— आणि ती किती मोठी असेल या अहंभावानें—तो शाळेंत नुकताच ड्रिल शिकायला लागला होता—तेंच घरांत सुरू करीत—तो बाहेर अण्णांच्याकडे गेला.

आणि पांच मिनिटांनीं परत आला.

चारहि भावंडें आपआपल्या मिळालेल्या गमतींत खूष होतीं.

* * *

आणि दिवाळीमध्यें राहिलेले दिवस आले आणि गेले— नंतर प्रत्यक्ष दिवाळी आली तरी अण्णांच्या घरांत दिवाळीचें सामान आलें नाहीं, फटाकडे नाहींत, फुलबाज्या नाहींत, कांऽहीं नाहीं.

फक्त दिवाळी आली!

—आणि आश्चर्याची गोष्ट, त्या घरांतल्या एकाहि मुलानें 'हें कां नाहीं, तें कां नाहीं' असें एका शब्दानेंहि विचारलें नाहीं!

शेजारींपाजारीं मिष्टान्नें होत होतीं. फटाकडे उडत होते, फुलबाज्या पेटत होत्या, पेटविलेले बाण आकाशांत भरारी मारीत होते आणि अण्णांच्या घरांतलीं मुलें— तें सर्व धीम्या नजरेनें पाहत होतीं; पण एकानेंहि तोंडाबाहेर शब्द काढला नाहीं, कीं चेहऱ्यावर हलाखी वा लाचारी दाखविली नाहीं!

**उजळलेले दिवे सजीव होऊन चालूं लागावेत, घरांत वावरावेत त्याप्रमाणें अण्णांचीं तीं चारीं मुलें अत्यंत समाधानी वृत्तीनें प्रज्वलित झालेलीं — पण शांत दिव्यांप्रमाणें घरांत वावरत होतीं!**

आणि यापेक्षां आनंददायी आणि तेजोमय दीपावलि कुठें अवतरली असेल का?

अनंताला शेजारच्या मुलानें विचारलें, "हें काय! या वर्षी तुमच्या अण्णांनीं फटाकडे नाहीं का आणले तुम्हांला? मी देऊं का तुला थोडेसे?"

"कशाला?" अनंता करारीपणानें म्हणाला, "आम्हांला हवे असते तर आमच्या अण्णांनीं नसते का आम्हांला आणून दिले! आम्हांलाच मुळीं नको आहेत फटाकडे या वर्षी!"

आपल्या हातांतील एक, इलेक्ट्रिकचा मोठा फटाकडा पेटवून अंगणांत फेकीत त्या शेजारच्या मुलानें विचारलें, "कां?"

मध्यंतरीं त्या अंगणांत फेकलेल्या फटाकड्याचा केवढा तरी आवाज झाला!

"उगीच! परदेशी फटाकडे आपण काय म्हणून उडवायचे?" अनंत— तो बाल देशभक्त, म्हणाला; पण त्याला फटाकडे नको असण्याचें कारण अगदींच वेगळें होतें.

ती दिवाळी अण्णांना अगदीं शांत आणि अडचणींत असूनहि अत्यंत आनंददायी गेली!

किती झालें तरी तें बापाचें अंतःकरण होतें. भाऊ-बिजेच्या दिवशीं कसें का होईना— पण घरांत थोडें अधिक गोड-धोड झालेंच.

पण पानावर तसें गोड-धोड येतांच मुलांनीं किलबिलाट केला—

" हें काय, हें कशाला आज ? "

" हं—असं म्हणायचं नाहीं—मिळेल तें खायचं, फक्त हट्ट करायचा नाहीं. येवढंच मीं तुम्हांला सांगितलं आहे ! " अण्णांनीं म्हटलें.

—आणि तो संवाद तिथेंच थांबला.

दिवाळी निघून गेली—आणि रोजचे दिवस चालू झाले.

—आणि नंतर एका नजीकच्या रात्रीं अण्णांचीं चारीं मुलें ओळीनें अंथरुणावर शांत झोपलीं होतीं. अनसूयाबाई आणि अण्णा उभ्या जगताच्या मोलानें त्या निद्रिस्त बालकांकडे पाहत होतीं.

" आपल्याला एक विचारूं का ? "

श्रीपादच्या अंगावरचें बाजूला झालेलें पांघरूण पुनः नीट त्याच्या अंगावर टाकीत अनसूयाबाईंनीं म्हटलें.

" विचारा कीं !—काय विचारायचं आहे ? " घड्याळाला किल्ली देत अण्णांनीं संमति दिली.

" पोरांना काय गम्मत सांगून आपण गप्प बसवलंत ? "

" तूं ओळख पाहूं—"

" नंतर त्यांना कांहीं तरी द्यायचं कबूल केलं असेल ! "

" छेः, कुणालाच कांहींहि द्यायचं मीं कबूल केलेलं नाहीं."

" खोटं. कांहीं तरीच— कांहीं द्यायचं कबूल केल्याशिवाय का पोरं इतकीं गप्प बसणार आहेत होय ? " अनसूयाबाईंनीं आपलें अनुमान सांगितलें.

" मी कुणाला कांहींहि द्यायचं कबूल केलेलं नाहीं ! आणि अप्रत्यक्ष जें द्यायचं कबूल केलेलं आहे तें मीं त्या सर्वांना केव्हांच देऊन टाकलं आहे ! ओळख आतां काय आहे तें ! "

" मला नाहीं बाई कल्पना येत— अशी आपण काय जादू केली आहे ती ! "

" आणि त्याची कल्पना मला तरी कुठं सुचली आहे. मुलांनींच सहज बोलतांना सूचित केली आणि मीं फक्त ती अमलांत आणली येवढंच ! "

" सांगावी ना काय ती ? "

" अग, त्या दिवशीं हीं सर्व चिलींपिलीं माझ्याभोंवतीं घोटाळलीं आणि माझ्या गंभीरपणानें दबकून मजजवळ कुणी कांहींच मागितलं नाहीं—आणि आपआपसांत 'मी कुणाचा' याबद्दल भांडूं लागलीं– त्यावरून मला एक कल्पना सुचली. आणि प्रत्येकाला मीं सांगितलं, 'मी तुझा एकट्याचा असायला पाहिजे ना ?–अगदीं खरं ? मग बघ— मी जर तुझ्या एकट्याचा असायला पाहिजे असेल, तर या दिवाळीला कसलाहि हट्ट करायचा नाहीं. किंवा मला हें हवं, तें हवं असं मागायचं नाहीं ! जो अजीबात हट्ट करणार नाहीं किंवा कांहीं मागणार नाहीं त्या एकट्याचाच मी ! हेंच मीं सर्वांना निरनिराळ्या वेळीं सांगितलं—"

" इश्श, आणि एवढ्यावर का मुलं गप्प बसलीं ! "

" बसलीं म्हणजे ? अग, आपलीं ना मुलं आहेत तीं ? आणि हें बघ— तुलाहि जर कांहीं हवं असेल तर सांगतों—जो कोणी कांहीं हट्ट करणार नाहीं किंवा मागणार नाहीं त्या एकट्याचा मी ! बघा बुवा काय तें—"

आणि तें दांपत्य सुखासमाधानाच्या अत्युच्च लहरींत हसलें !

आणि नंतर थोड्याच वेळांत—

" कालभैरव–दंडपाणी–काशीविश्वेश्वर—काशीविश्वेश्वर ! " असें शांतपणानें म्हणत अनसूयाबाईनीं पदरांनीं दिवा मालवला.

आणि तीं गृहरत्नें झोपेंत बडबडत होतीं, " नाहीं, मीं कांहीं म्हणजे कांहींच हट्ट केला नाहीं. आतां—

" **अण्णा माझे !**

**अण्णा माझे !**

**अण्णा माझे !** "

—आणि हे प्रत्येकजण म्हणत होता !

---

# पैज : : १०

त्या दोघांची मैत्री अगदीं दृष्ट लागण्यासारखी होती. त्यांपैकीं एक होता लेखक आणि दुसरा होता व्यापारी !

लेखक—अर्थात् दरिद्री होता !

पण तें दारिद्र्य निष्कलंक असल्यामुळें त्याला स्वतःच्या दारिद्र्याचा अभिमान होता.

व्यापारी खूप श्रीमंत होता !

लेखकाचें नांव होतें श्रीकांत आणि व्यापाऱ्याचें नांव होतें विठोबा. दोघेहि ना एका जातीचे– ना गोताचे. केव्हां तरी प्रसंगानें त्यांची ओळख झाली आणि त्याचें अत्यंत जिव्हाळ्याच्या मैत्रींत रूपांतर झालें.

विठोबाचा तंबाखूचा व्यापार होता. त्यांत त्याला खूप पैसा मिळे.

श्रीकांताचा व्यापार होता लेखनाचा. त्यांत त्याला कांहींच मिळत नसे.

श्रीकांत कुठें तरी नोकरी करीत होता. पण श्रीकांताची वृत्ति समाधानी होती. तो आपल्या नोकरीच्या थोड्याच पैशांत अभिमानानें राहत असे.

विठोबा आपल्या तंबाखूच्या दुकानांत गिऱ्हाईक नसलें कीं, वर्तमानपत्रें वाचीत बसे. त्या वर्तमानपत्रांत कधीं श्रीकांताचें नांव छापून आलें, कीं विठोबाला हर्ष होई. त्या वेळीं त्याच्याजवळ कोणी असलें तर तो त्याला अभिमानानें सांगे, "श्रीकांत आपला दोस्त आहे!"

एक दिवस विठोबानें वर्तमानपत्रांत श्रीकांताचें नांव वाचलें आणि त्याच्या-खालीं आलेला मजकूर वाचून तर, त्याला हर्षवायु होण्याची वेळ आली. तो आपल्या अंवतींभंवतीं कावराबावरा पाहूं लागला! त्यानें दुकानांत किती माणसें बसलेलीं आहेत तीं मोजलीं. दुकानांत त्याचे कांहीं धंदेवाईक मित्र बसले होते.

—शेजारच्या हॉटेलांतील पोऱ्या बाहेर नेलेल्या चहाच्या रिकाम्या कप-बश्या खडखड वाजवीत चालला होता. आणि त्या चहाचे आलेले पैसे—त्या पैशांत एक बोट मधें घालून चिपळ्यांसारखे वाजवीत तो हॉटेलचा पोऱ्या चालला होता.

विठोबानें त्याला हटकलें आणि दुकानांत जितकीं माणसें होतीं त्यांच्यांत स्वतःची एक भर घालून त्यानें चहा आणायला सांगितला.

—मागितल्याशिवाय विठोबा आज आपल्याला चहा कां सांगतो आहे याचा त्याच्या स्नेह्यांना उलगडा होईना. सर्वजण त्याच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागले.

"चहानंतर सुका कात मसाला पाहिजे!" एकानें उद्गार काढला.

"—आणि पिवळा हत्ती!" दुसरा उद्गारला. विठोबा आनंदातिशयानें म्हणाला, "काय वाटेल तें मागा आज– काय जिलबी, बासुंदी सांगूं?"

चहावाला पोऱ्या आर्डर नक्की होण्याकरितां तिष्ठत उभा होता.

* * *

इतक्यांत विठोबानें दुकानची साखळी धरून टुणकन् रस्त्यांत उडी घेतली. झटकन् रस्त्यानें खालीं मान घालून जाणाऱ्या एका माणसाचा त्यानें कोट पकडला.

तो श्रीकांत होता.

रस्त्यांत आपल्याशीं एवढी कोण सलगी करतो आहे तें श्रीकांत आश्चर्यानें पाहूं लागला.

“ विठोबा, रस्त्यांत असं चांगलं नाहीं ! ” श्रीकांत आपल्या कोटावरून विठोबाचा हात काढीत विनयानें म्हणाला.

“ मोठा झालास इतक्यांत ? इतक्यांत मान चढला तुला ? चल ये वर दुकानांत ! अरे, इतक्यांत अशी दृष्टि फाकूं देऊं नकोस ! अरे राजा, आज चहापार्टी पाहिजे तुझ्याकडून ! ”

विठोबाला आज काय झालें आहे तें श्रीकांताला कळेना. तो रस्त्यांत बोलाचाली नको म्हणून विठोबाच्या दुकानांत शिरला.

विठोबानें वर्तमानपत्र श्रीकांताच्या डोळ्यांसमोर धरलें. “ ही बातमी सांगितलीस तूं मला ? चल पेढे काढ अगोदर ! ”

एका नाणावलेल्या सिनेमा कंपनीनें श्रीकांताकडून एक चित्रपटकथा लिहून घेण्याचें नक्की केल्याचें त्या बातमींत लिहिलें होतें !

“ अन् असा का चेहरा टाकून चालला होतास रस्त्यानं ? इतक्या पैशाचं काय करायचं ही चिंता लागली होय तुला इतक्यांत ? ”

“ विठोबा, अजून बच्चा आहेस ! पैशाचा नव्हता विचार पडला मला. कथानकाचा मी विचार करीत होतों.” श्रीकांतानें उत्तर दिलें.

त्या नाणावलेल्या सिनेमा कंपनीच्या भावी कथालेखकांशीं विठोबा इतक्या सलगीनें बोलत आहे हें पाहून विठोबाच्या स्नेह्यांचा विठोबाबद्दल आदर फारच वाढला.

“ श्रीकांत, बोल किती पैसे ठरले कथानकाचे ? ”

“ सांगेन—आपण एखाद्या वेळीं मनमोकळेपणानं भेटलों म्हणजे ! ” श्रीकांतानें वेळ मारून नेण्याकरितां म्हटलें.

पण तें ऐकून विठोबा खूपच चिडला. त्याला त्या प्रसंगाची कांहीं तरी एक विशेष नशा आली. पण त्या नशेला अजीजीचा स्वर देत विठोबा म्हणाला, “ पण कमींत कमी पांच हजार तर ठरले असतील ? ”

श्रीकांत मिस्किल हसला आणि त्यानें मानेनेंच नाहीं म्हटलें.

" खोटं ! खोटं, साफ खोटं ! ! नटींना हजारों रुपये पगार महिना असतात ! बाकीच्यांनाहि खूपखूप असतात आणि लेखकाला ? "

" विठोबा, हा वाद इथं कशाला ? " श्रीकांत कांहींसा लाजेनें म्हणाला.

" बरं तीन हजार तरी ठरलेत ? "

" नाहीं ! "

" श्रीकांत, खोटं बोलतो आहेस तूं ! " विठोबा सलगींतच बोलत होता. श्रीकांताची किंमत कमी ठरण्यानें विठोबाची किंमत कमी ठरल्यासारखें त्याला वाटत होतें. " बरं तीन हजार नाहीं– मग किती पांच रुपये ठरले ? " विठोबानें चिडीनें विचारलें.

श्रीकांत शांतपणानें म्हणाले, " हं– त्याच्याच आसपास ! "

येवढ्या दंगलींत चहावाला पोऱ्या निघून गेला होता आणि मिळाली तेवढी ऑर्डर तो घेऊन आला होता.

" शेठ, चहा भरूं ? " कपबशा खडखडावीत पोऱ्यानें विचारलें.

" हं–भर ! " विठोबानें म्हटलें आणि त्यानें श्रीकांताला आपल्या हातानें धरून आपल्या मालकी बैठकीवर बसविलें. चहाचा भरलेला पहिला कप त्यानें श्रीकांताला दिला. बाकीच्यांनाहि नंतर मिळाला.

" हं– श्रीकांत चहा घे ! " विठोबानें फर्माविलें.

चहा थोडा थंड झाला होता. श्रीकांतानें कपानेंच चहा पिण्यास सुरुवात केली. त्याला मनांतल्या मनांत कसलें तरी गमतीदार हसूं येत होतें. चहा पितां पितां किलकिल्या डोळ्यांनीं तो दुकानाबाहेर पाहत होता. समोरच एक वेश्येची माडी होती. खूप श्रीमंतीनें सजविली होती ती. तो गुरुवार होता वाटतं. एक तेलंगी ब्राह्मण हातांत पूजासाहित्य घेऊन वर माडीवर जातांना त्याला दिसला. त्याला आश्चर्य वाटलें. तो माडीवर पाहूं लागला. वर एक दत्ताची तसबीर होती. त्या तेलंगी ब्राह्मणानें त्या तसबिरीच्या पूजेला सुरुवात केली. पूजा संपली. वेश्येनें त्या ब्राह्मणाला नमस्कार केला. तें दृश्य पाहून श्रीकांताला गंमत वाटली.

श्रीकांताचा चहा घेऊन झाला. त्यानें कपबशी खालीं ठेवली व म्हटलें, "विठोबा, माझें कथानक खपल्याबद्दल या चहाचे पैसे मी आतां देतों." श्रीकांत आपल्या खिशांतील पैशाचें पाकीट काढीत म्हणाला.

विठोबानेंहि कांहींच कुरकुर न करतां श्रीकांताला चहाचे पैसे देऊं दिले.

" श्रीकांत ! " विठोबा हिरीरीनें उद्‌गारला.

श्रीकांतानें विस्फारलेल्या नजरेनें विठोबाकडे पाहिलें.

" पैज तुझी माझी ! तूं माझ्याशीं लपंडाव खेळतो आहेस. चल मीच कमवीन किंवा गमवीन ! तुझा-माझा सौदा ! "

" कसला रे बाबा ? "

" मी तुला आज दोन हजार रुपये देतों. कंपनीकडून मिळतील ते सर्व पैसे मला दे ! "

श्रीकांताला आपलें हसूं आवरेना.

" मग कंपनीकडून तुला पांच रुपये मिळोत नाहीं तर पांच हजार मिळोत, मीं तुला आज दोन हजार रुपये द्यायला तयार आहे. चल बोल— आहे कबूल ? "

विषय थांबावा या हेतूनें श्रीकांत म्हणाला 'कबूल'.

" नुसतें कबूल नाहीं. या चार लोकांदेखत व्यवहार ठरूं दे. मी आतां दोन हजार रुपये मोजायला तयार आहे ! " विठोबा ऐकेना असें पाहून श्रीकांतानें सर्व कबूल केलें— लिहून दिलें. विठोबानेंहि त्या तडफेंत दोन हजारांचा चेक लिहून दिला.

* * *

दुकानांतली बैठक संपली. विठोबाला आज कसला तरी कमालीचा आनंद झाला होता. श्रीकांत दुकानांतून बाहेर पडला आणि पुन्हा आपल्या तंद्रींत रस्त्यानें निघून गेला.

त्या दिवसापासून सिनेमाविषयक वर्तमानपत्रें विठोबा आस्थेनें चाळूं लागला.

कंपनीच्या नवीन चित्रपटाच्या बातम्या येत होत्या, पण त्यांत श्रीकांताचें

नांव कोठेंच येत नव्हतें. जाहिरातींच्या यज्ञांत दिग्दर्शकाच्याच नांवाच्या एकसारख्या आहुति पडत होत्या. विठोबाच्या वेड्या मनाला वाटलें हें असें कां?

कथा-लेखकानें लिहिलेला चित्रपट त्याचें नांव न घालतां आणि त्याला डावलून दिग्दर्शकानें आपल्या नांवावर गाजविणें म्हणजे त्याला वाटलें एखाद्या सुइणीनें एखाद्याचें पोर मागून आणून स्वतःच बाळंतीण झाल्याची जाहिरात करण्यासारखें आहे. आणि मग त्याला कळलें, कीं चित्रपट-सृष्टींत हें नवीन नाहीं! कारण तो आपण पाहिलेल्या एक-एका चित्रपटांचीं नांवें आठवूं लागला आणि गंमत अशी होई कीं, चित्रपटाचें नांव आठवलें कीं लगेच शेपटासारखें त्याला त्या चित्रपटाच्या दिग्दर्शकाचें नांव आठवे!

—आणि लेखक? कुणाचेंच नांव त्याला आठवेना! तो चिडून स्वतःशींच ओरडला, "चोर आहेत लेकाचे!" आणि लगेच त्याला आठवलें, या चोरांनाच कलावंत म्हणतात!

—दिवसांमागून दिवस जात होते. श्रीकांताच्या चित्रपटाच्या तालमी चालू असतांनाचें फोटो येऊं लागले! नट-नटींची जाहिरात त्याला योग्य वाटली; पण त्यांतहि दिग्दर्शकाचें माकड लेखकाला अंधारांत ठेवून फक्त आपला चेहरा दाखवितें याचा त्याला उलगडा होईना!

—विठोबा हा बोलून-चालून एक तंबाखूचा व्यापारी होता. त्याला दिग्दर्शकाची किंमत काय कळणार?

तो मूर्ख होता—अज्ञानी होता म्हणूनच दिग्दर्शकाच्या (विठोबाच्या दृष्टीनें तालीममास्तराच्या) भूमिकेची श्रेष्ठता त्याला कळत नव्हती!

दिग्दर्शक ही सिनेमासृष्टींत केवढी अजब शक्ति आहे—हें त्या तंबाखू-वाल्याला काय कळणार?

दिग्दर्शक म्हणजे जास्त काय सांगावें, सिनेमासृष्टीचा मयासुर आहे! आहे त्याचें नाहीं करणें आणि नाहीं तें आहेसें दाखविणें, काय अजब करामत आहे!

एकाच उदाहरणांत पहा ना—स्वतःचें महत्त्व एवढें वाढवून घेतो, कीं लेखकाला नाहींसा करतो !

याला काय बुद्धिमत्ता लागत नाहीं ? यांत काय कसब नाहीं ?

का यांत कांहीं 'अभ्यासू'पणा नाहीं ?

दिवसांमागून दिवस जात होते. दिग्दर्शक आणि चित्रपट गाजत होता आणि श्रीकांत सचिंतपणें कदाचित् दुसऱ्या कथानकाबद्दलचे विचार मनांत घोळवीत त्या विठोबा तंबाखूवाल्याच्या दुकानावरून जात होता.

—उद्यां तो श्रीकांताचा चित्रपट लागणार होता.

—विठोबा आतां अधीर झाला होता.

" श्रीकांत पैसे केव्हां आणायला जायचं ? "

" उद्यां मिळतील ! मिळाल्याबरोबर आणून देतों तुला ! "

इतक्यांत विठोबा गळेपडूपणानें म्हणाला, " हें बघ श्रीकांत—तसं नाहीं जमायचं. पैसे घेतांना मीं बरोबर यायला पाहिजे ! बाबा रे, पैसाच माणसाला खोटं बोलायला लावतो. पैसे आणतांना मी बरोबर पाहिजे ! "

श्रीकांत म्हणाला, " पण तें कसं शक्य आहे ? अरे, आमच्या कंपनीचा व्यवहार इतका गुपचुपीचा आहे, कीं तिथं नोकरी करणाऱ्या लोकांना आपल्याला किती पगार आहे हें माहीत नाहीं आणि बाहेर सांगायची परवानगी नाहीं ! प्रत्येक नोकरानं डोळे मिटून आपल्या नांवापुढं कॅशिअर बोट दाखवील तिथं सही करायची आणि तसेंच डोळे मिटून कॅशिअरपुढं खिसा करायचा—कॅशिअर आंत टाकील तो त्याचा पगार ! इतका बंदोबस्त आहे तिथं आणि ते तुला कसा येऊं देणार तिथं ? "

" तूं मनावर घेतलंस तर जमेल—म्हणजे काय, मला संशय राहणार नाहीं ! "

" पाहतों प्रयत्न करून ! "

* * *

श्रीकांताला तशी परवानगी मिळाली. कंपनींत जायचें म्हणून विठोबानें जास्त नीटनेटका पोशाक केला. आणि एक दिवस दोघेहि कंपनीच्या ऑफिसांत दाखल झाले.

विठोबा मनांतल्या मनांत कसल्या तरी कल्पनेच्या मिटक्या मारीत होता.

दिग्दर्शकच त्या कंपनीचा मालक होता. लेखकाचें नांव कुठेंच फारसें न घेतल्यामुळें त्या दिग्दर्शकालाहि मळमळत होतें वाटतें. तो त्या प्रसंगांत श्रीकांताची भरमसाट स्तुति ओकीत होता आणि जसजशी श्रीकांताची स्तुति वाढत होती तसतसा विठोबा आपल्याला या व्यवहारांत पांच हजार मिळणार का दहा हजार मिळणार असलीं मनोराज्यें करीत होता.

अखेर व्यवहाराची वेळ आली.

विठोबाला धाप लागली— आनंदाची !

एक टाइप केलेली पावती श्रीकांतापुढें सारली गेली.

" सदर चित्रपटाचे सर्व प्रकारचे हक्क आमचे आहेत कारण चित्रपट आम्हीं तुम्हांस लिहायला सांगितला आहे. सदर चित्रपटांतील पद्यें ग्रामोफोन रेकॉर्डसमधून मिळणाऱ्या पैशावर, सदर चित्रपटाचे संवाद पुस्तकरूपानें विकून येणाऱ्या फायद्यावर, सर्वस्वीं हक्क आमचा आहे. कारण चित्रपट तुम्हीं लिहावा ही कल्पना आमची आहे ! सदर चित्तपटाचे पैसे आम्ही तुम्हांस देत असल्यामुळें सदर चित्रपट आपणांसुद्धां आपल्या स्नेह्यां-सोबत्यांनीं फुकट पाहण्याचा हक्क आपला अर्थात् नाहीं; पण 'जीवदया प्रसारक संघा'चे आम्ही वर्गणीदार असल्यामुळें चित्रपट पडल्यानंतर आठवडे वाढविण्याकरतां जीं माणसें लागतात त्या आठवड्यांत आपणांस 'मॅटिनी' शोचे तीन पास देऊं. आपल्या पदांचें रेकॉर्ड आपणांस पाहिजे असल्यास— पहिला सेट निम्या किंमतीला व पुढें भर किंमतीस—आम्हांला येतील त्यांतले देऊं. सदर चित्रपटांत आपण लिहिलेंत त्यापेक्षां आपणांस सिनेमाच्या धंद्यांतील तंत्र-मंत्र-जादूमंतर कळत नसल्यामुळें, आम्ही आपली अक्कल चालवून जे कांहीं फार-फेर केले असतील– ते तुमच्या संमतीनें केले आहेत– असें, तुम्ही समजायचें अन् कोणी विचारल्यास कबूल करायचें."

येथें लेखक अडला आणि केविलवाणेपणानें म्हणाला— " केवळ एक गंमत म्हणून आतांपर्यंत आपण म्हणालांत त्याला मीं मान तुकाविली, पण मला खोटं बोलायला लावूं नका बुवा ! "

" खोटं ?—" दिग्दर्शक-मालक गंभीर संतापानें म्हणाला, " आमच्या

धंद्यांत खोटं कांहीं असतंच नाहीं— जें खरं नसतं त्याला आम्ही 'ट्रिक सीन' म्हणतों.—"

"पण माझ्या चित्रपटकथेंत काय फेरफार केले आहेत तें मला माहीत तरी आहेत का? आपली कंपनी शिस्तबाज असल्यामुळं लेखकाला तालमी दाखवायच्या नाहींत ही आपली शिस्त मीं मुकाट्यानं मान्य केली! पण मला खोटं बोलायला कां लावतां?"

"अहो पण, आम्हीं जें केलं असेल तें तुमचं चांगलं व्हावं म्हणूनच ना?"

"सदिच्छा मान्य—पण मग हें कबूल करण्याचा तोबरा माझ्या तोंडीं कां?"

"अहो, मग लेखकाची कुचंबणा केल्याची निष्कारण ओरड होते—वास्तविक आम्ही लेखकांना चान्स देतों—"

"मी स्वतः पांच हजार सहाशें सत्तावीस जन्म उतराई आहे मला तुम्हीं दिलेल्या चान्सबद्दल! कोण्या जन्माची माझी पुण्याई फळाला आली आणि आपली-माझी गाठ पडली."

"हें पहा, निष्कारण स्तुति करूं नका. —मला असल्या तोंडी स्तुतीचा कंटाळा आला आहे. वेळ पडली तर दस्तऐवजी छापील स्तुति करा! कारण आम्ही धंदा करतों तो देशाकरितां— धर्माकरितां— समाजाकरितां! करा सही लवकर—"

तंबाखूचा व्यापारी विठोबा याला सुद्धां घाई झाली होती. तो म्हणाला, "कर रे बाबा सही लवकर—"

"बघा तर खरं!" दिग्दर्शक तंबाखूवाल्याला म्हणाला. "हे लेखक म्हणजे नसते भावनाप्रधान. फरक केले आणि न केले— विचारतो कोण लेखकाला! आम्हांला सवड सापडत नाहीं म्हणून यांना आम्ही कागद खराब करायला सांगतों— आणि कारकून म्हणायचं ते लेखक म्हणतों!" व्यवहार संपत आल्यामुळें दिग्दर्शक आतां बेडरपणानें बोलूं लागला होता.

लेखक मोठ्यांदा हसला आणि त्यानें त्या पावतीवर सही केली.

दिग्दर्शक-मालकानें झटकन ड्रॉवर उघडला आणि त्यांतून दहा दहा रुपयांच्या पांच नोटा आणि एक बंदा रुपया काढून लेखकापुढें टाकला.

विठोबाला श्वास लागला. तो एखाद्या गोळी लागलेल्या कुत्र्याप्रमाणें विवळून म्हणाला, " मालक— हें काय एवढेच? अ–गो–द–र कांहीं दिले होतेत काय ?"

" अगोदर? आम्ही एखाद्या चांभारावर विश्वास टाकूं पण लेखकावर विश्वासून राहणार नाहीं— लेखकाला अगोदर कांहीं देण्याची आमच्या कंपनींत पद्धत नाहीं!"

" बरं, नंतर कांहीं देणार आहांत काय?"

" जो अगोदर देत नाहीं तो नंतर काय देणार? अहो, आतांपर्यंत आम्ही पन्नास रुपये लेखकाला देत आलों– पण आमचा धंदा आतां जरा बरा चालला आहे– तेव्हां यांना म्हणून एकावन रुपये दिलेत!"

विठोबा ताडकन् उभा राहिला आणि कपाळावर हात मारून घेत म्हणाला, " देवा–देवा! अरे श्रीकांत, तूं एवढं तरी बघ रे– कीं त्या पांच नोटा तरी ब्रिटिश सरकारच्या आहेत का? का खिलाफत कमिटीच्या आहेत त्या?" येवढे शब्द चाचरत चांचरत बोलून विठोबा धाडकन् बेशुद्ध होऊन खालीं पडला!

—एक सिच्युएशन निर्माण झाली या आनंदानें, दिग्दर्शकाला आनंदाचे आऊर लोटलें. त्यानें श्रीकांताला विचारलें, " ही काय भानगड आहे?"

लेखकानें पैजेची हकीगत सांगितली. विठोबाच्या बेशुद्ध पडण्यानें तिथें माणसें जमा होऊं लागलीं. त्या गर्दीच्या जाणीवेनें दिग्दर्शकानें ते टेबलावरचे एकावन रुपये व सही केलेली पावती ड्रॉवरमध्यें टाकून किल्ली फिरवली.

" पाणी–पाणी—" लेखक विठोबाला मांडीवर घेत ओरडूं लागला.

पाणी, कोणी तरी आणायला गेला.

दिग्दर्शक आपली कळवळ्याची भावना बडबडायला लागला.

त्यानें गंभीरपणानें छातीवर आपल्या दोन्ही हातांचा चौकोन केला— आकाशाकडे नजर लावली– आणि झटकन त्याच वेळीं आपला कोणी फोटो घेतल्यास कसा दिसेल तें समोरच्या आरशांत पाहिलें— आणि स्वतःच्या छबीवर खूष होत—पुनः प्रसंगाला साजेसा गंभीर चेहरा करीत म्हणाला, " तपश्चर्या करा! वाट पाहा!! उजेड दिसेल!! प्रकाश! प्रकाश!! प्रकाश!!!"

" अंधार! अंधार!! अंधार!!! " विठोबा बरळत होता.

" जरा प्रकाश कमी करा हो–" दिग्दर्शकाकडे पाहत श्रीकांत म्हणाला आणि तो विठोबाच्या डोक्यावर पाणी शिंपीत म्हणाला, " बाळ विठोबा शुद्धीवर ये! शुद्धीवर ये! तुझा दोन हजारांचा चेक मीं पटवला नाहीं बरं बाळ! चित्रपट-कथेला एकावन रुपये मिळतात हें तुला सांगून खरं वाटलं नसतं म्हणून मीं तुझ्या पैजेला मान्यता दिली! अरे, मीं माझ्या लेखनाकडे पैशाच्या दृष्टीनं कधीं पाहिलंच नाहीं! आपले उद्‌गार ऐकले जावे. लेखनाच्या रूपानं अंतः-करण उघडं करण्यांत समाधान आहे! अरे, सिनेमाधंद्याची या कलावंतांनीं बाळंतिणीची खोली केल्यामुळं—आम्हांला तंत्र समजत नाहीं! अरे जागा हो, शुद्धीवर ये! तुला तरी अजून सिनेमाच्या धंद्यांतलं काय माहीत आहे रे, तुला टेम्पो माहीत आहे काय? मॉंटाज माहीत आहे काय? प्लेबॅक–गेट आउट माहीत आहे काय? मग कसं बरं बाळ एकावन रुपयांच्यावर आपल्याला पैसे मिळावेत? हा घे बरं बाळ तुझा चेक परत. आणखी एक वर पैसा देऊं का तुला—एक्स्ट्रॉ स्ट्रॉंग पेपरमिंट घ्यायला? "

विठोबा शुद्धीवर आला. त्यानें दोन हजारांचा चेक खिशांत टाकला आणि त्याला लागलेला श्वास कमी झाला.

" चल– शक्य तितक्या लवकर आपण या यक्षभूमींतून बाहेर पडूं या! " आणि पुन्हा श्वास लागल्यासारखें करून तो श्रीकांताच्या कानांत म्हणाला, " तुझे एकावन रुपये घेतलेस का? तो रुपया बघून वाजवून घे—नाहीं तर तोहि खोटा असेल! "

" नाहीं तेहि पैसे मीं त्यांना एक्स्ट्रॉ स्ट्रॉंग पेपरमिंट खाण्याकरितां दिले आहेत! चल तूं आपला—" विठोबाच्या खांद्यावर हात टाकून श्रीकांत म्हणाला.

पण विठोबाचें पाऊल बाहेर निघेना.

" थांब ना, महाराष्ट्रांतल्या या पहिल्या दर्जाच्या–"

" नव्हे पहिल्या नंबरच्या! " लेखकानें शब्द सुचविला, विठोबानें त्या कलावंतांपुढें साष्टांग नमस्कार घातला.

आणि बाहेर पडल्यानंतर विठोबा तंबाखूवाला लेखकाला हळूच कुजबुजत म्हणाला, “पण काय रे, यांच्या मुलाखतींत हे घिसाडी काय सभ्य वाटतात!”

“तिथंच फक्त या पोपटांना कंठ फुटतो! मुलाखतीला माणूस आला, कीं पोपट बोलतोय– लेखकाचं महत्त्व आम्हीहि मानतों. पण लेखक काय जर असं म्हणायला लागला तर मी तसं म्हणेन, अरे पण हो लेकांनो! लेकाचे धंदेवाले आणि कला-देश-धर्म असा बकवा कां विनाकारण करतात कुणाला ठाऊक! नुसते धंदेवाले आहोंत हें जर हे कबूल करते ना, तर एकावन रुपयांत गोष्ट मिळविण्याबद्दल मीं यांचं जाहीर अभिनंदन केलं असतं– आणि ही यांची कर्तबगारी अशीच वाढत जाऊन पुढें यांना पांच रुपयांतहि गोष्ट मिळविण्यांत यांना यश येवो अशी मीं या कलेच्या कांद्यांकरितां परमेश्वराला प्रार्थना केली असती!”

---

# धर्म ही अफू आहे : : ११

मी राहतों तिथें जवळच एक मोठें थोरलें देऊळ आहे. इतर देवळांना असतात त्याप्रमाणेंच त्या देवळाला बाहेर दोन चौथरे आहेत.

मी सहसा त्या देवळांत कधीं जात नाहीं. पण माझें घर जवळच असल्या-मुळें त्या देवळांतील सकाळसंध्याकाळचे नगारे-चौघडे मला घरबसल्या ऐकूं येतात!

—दुपारींच कधीं मी बाहेर पडलों तर दुपारच्या उन्हानें तळपणारा त्या देवळाचा एकाकी कळस माझें लक्ष वेधून घेतो. त्यानें माझे डोळे दिपल्या-सारखे होतात म्हणून माझी नजर जरा बावचळते आणि खालीं-वर होऊं लागते, तोंच त्याच देवळांतील पारावरील वाढलेल्या मोठ्या थोरल्या पिंपळाच्या झाडाचीं पानें सूर्यप्रकाशांत तळपतांना दिसतात!

—जातां जातां देवळाच्या उघड्या दारांतून एखादे वेळीं माझी नजर सहज आंत जाते, तों त्या देवळाच्या प्राङ्गणांत– ज्यांच्यावर कोणीहि मालकी

हक्क सांगत नाहीं अशीं चारपांच गुरेंढोरें–कुणी सावलीला बसलेलीं दिसतात, तर कुणी रवंथ करीत बसलेलीं आढळतात !

—बाहेरच्या चौथऱ्यावर— सिंहासनावर बसल्याच्या ऐटींत, कित्येक वेळेला आळींतील कुत्रीं बसलेलीं आढळतात !

—कधीं कांहीं सणानिमित्त देवळांतील दीपमाळ सर्वांगांनीं तेवतांना दिसते. पण आजूबाजूला कोणीच दिसत नाहीं. दीपमाळेचा प्रकाश वाऱ्याच्या झोतांनीं हलत असतो, त्यामुळें देवळांतील प्राङ्गणांत अंधार-उजेडाचा शिवाशिवीचा खेळ चालल्यासारखें वाटतें. पण तो पाहण्याला तिथें माणसें कुणी दिसत नाहींत.

पहारेकऱ्यांच्या विश्वासावर गांवानें झोपावें त्याप्रमाणें आजूबाजू झोपलेली असते ! आणि अशा वेळीं त्या देवळाच्या ओरींतून एखादा दमेकरी निराश्रित म्हातारा फक्त आपल्या अंगावरचें फाटकें पांघरूण सावरीत खोकतांना ऐकूं येत असतो !

—आज पांच-सहा महिने एक गोष्ट माझ्या लक्षांत आली होती. त्या देवळाच्या बाहेरच्या चौथऱ्यावर एक सुमारें पंचेचाळीसच्या सुमाराचा गृहस्थ नेमका सकाळचें ऊन्ह खायला येऊन बसत असे व संध्याकाळींहि विश्रांती-करितां येऊन बसत असे.

सकाळीं अडीच तास आणि संध्याकाळीं दोन-अडीच तास त्यानें जणूं त्या दोन देवळांची राखणच पत्करली होती !

—त्या माणसाकडे मी जातां येतां नेहमीं न्याहाळून पाहत असे. त्या गृहस्थाची परिस्थिति आज जरी अत्यंत हलाखीची वाटत होती, तरी त्याचें शरीर एके काळीं चांगलें पोसलेलें वाटत होतें ! त्याच्या डोळ्यांत एक प्रकारची कदर आणि सुसंस्कृतता दिसत होती.

आपला डाव खेळून झाल्यानंतर दुसऱ्याचें खेळणें शांतपणें पाहत बसावें अशी त्याची आजूबाजूला बघण्याची वृत्ति दिसत होती. पण त्याचबरोबर आपण खेळलेला डाव हरलों आहोंत या जाणीवेची एक खजिलपणाची वृत्तिहि त्याच्या पाहण्यांत दिसत होती !

तो माणूस कांहीं भीक मागण्याकरितां तिथें येऊन बसत नसे. आल्यागेल्या

माणसांकडे तो अगदीं आपुलकीच्या दृष्टीनें न्याहळून पाहतांना दिसे. जाणारा येणारांचीं संभाषणें कान देऊन तो ऐकत असे. त्या संभाषणांतील शब्दांनीं कांहीं वेळेला त्याच्या गतायुष्यांतील कांहीं अनुभव जागे होत— कारण कित्येक वेळेला त्याच्या डोळ्यांवर, ऐकलेल्या संभाषणांमुळें अश्रूंचा तवंग तरंगतांना दिसे !

—किती तरी दिवस मला त्याची विचारपूस करावीशी वाटत होती पण जमलें नाहीं. पण एक दिवस कांहीं कारणामुळें माझें रात्रीचें जेवण लवकर झालें अन् मी फिरण्याकरितां बाहेर पडलों. फिरण्याकरितां म्हणून मी जरी बाहेर पडलों होतों तरी जेवण झालेलें असल्यामुळें मी जवळजवळ रेंगाळतच चाललों होतों.

—ती रात्र अंधेरी होती.

—रस्त्यानेंहि जवळ जवळ सामसूमच होतें.

—मी थोडा वेळ इकडे तिकडे फिरलों आणि दहाच्या सुमारास घराकडे वळलों. येतांना माझें लक्ष सहज त्या देवळाच्या चौथऱ्याकडे गेलें. माझें लक्ष ज्या माणसानें वेधलें होतें तो माणूस आतां या अवेळींहि मला त्या देवळाच्या चौथऱ्यावर बसलेला दिसला.

—आकाशांतील चांदण्यांकडे, एखादें महत्त्वाचें पत्र वाचतांना गढून जावें अशा सूक्ष्म दृष्टीनें तो लक्ष लावून पाहत होता.

—मी त्याच्याजवळ गेलों आणि त्याचें लक्ष माझ्याकडे वेधून घेण्याकरितां थोडासा खाकरलों. कावऱ्याबावऱ्या नजरेनें तो माझ्याकडे पाहूं लागला.

मीं म्हटलें, " नमस्कार ! किती तरी दिवस मी तुमच्याजवळ बोलायचं म्हणत होतों, पण अखेर आज योग आला ! "

तोहि एकदम गमतीदारपणानें हसत म्हणाला, " नमस्कार. बसा असे—" त्यानें समोरच्या दुसऱ्या चौथऱ्याकडे बोट दाखवीत म्हटलें.

आपल्या घरीं एखाद्याला आदरातिथ्यानें 'या-बसा' म्हणावें तशा थाटांत तो बोलत होता.

मी मुकाट्यानें त्याच्या समोरच्याच चौथऱ्यावर बसलों.

—तो मात्र माझ्याकडे पाहून एकसारखा गालांतल्या गालांत हसत होता.

मी त्यामुळें थोडासा खजील झालें.

" आज बरेच दिवस मी तुम्हांला इथं बसतांना पाहतों आहे. कांहीं तरी कुतूहलानं बरेच दिवस मला वाटत होतं— आपली कांहीं सहज चौकशी करावी म्हणून. आज सहज तो योग आला ! " मीं म्हटलें.

तो कांहीं तरी एकदम अकल्पित आनंद झाल्यासारखा तरारून उभा राहिला आणि सलगीनें माझे हात आपल्या हातांत घेत म्हणाला, " काय देवमाणूस आहांत हो ! "

—मी लाजलें.

" माझी हकीकत ऐकायची आहे तुम्हांला ? खरंच म्हणतां– पण पाहा हं पश्चात्ताप होईल माझी हकीकत ऐकल्यानंतर ! – माझी काय तयारीच आहे आपली हकीकत सांगायला. किंवा ती ऐकण्याकरितां एखादा श्रोता भेटावा याची मी आज कित्येक वर्षं वाटच पाहत आहे म्हणा ना ! "

" कित्येक वर्षं ? " मीं आश्चर्यानें विचारलें.

" होय, कित्येक वर्षं ! आज मी या देवळाच्या चौथऱ्यावर जवळ जवळ वर्षभर येऊन बसतों आहे— एकाहि माणसानं कधीं माझी चौकशी केली नाहीं ! कित्येकांना तर मी या चौथऱ्याचाच एक भाग आहे असं वाटूं लागलं आहे ! परवां मला इथं येऊन बसायला थोडासा उशीर झाला– तेव्हां कोणी तरी आपआपसांत माझी चौकशी करीत होते– 'या चौथऱ्यावरचा माणूस काय झाला हो–?' इतक्यांत मी आलों– मीं तें ऐकलं– झालं; त्या माणसांचं समाधान झालं ! माझ्याशीं एक चकारशब्दहि न बोलतां तीं माणसं आपल्या कामाला निघून गेलीं ! "

आपल्या या बोलण्याचा माझ्यावर काय परिणाम होतो आहे हें पाहण्याकरितां तो एक मिनिट थांबला. आणि नंतर लगेच आवेगानें बोलूं लागला, " पण या शिक्षेला मी पात्र आहे ! खरंच, मी या शिक्षेला पात्र आहे ! मला वाटतं, त्या वेळेला माझं वय वीस-बावीस वर्षांचं असेल— माझं शिक्षण संपलं होतं किंवा संपण्याच्या बेतांत होतं–मी आवेगानं माझा आवडता मतप्रचार करीत असे, कीं 'धर्म ही अफू आहे ! देवळं हीं आळशी माणसांच्या खाणी–साठवणीचीं ठिकाणं आहेत ! देशाच्या अभ्युदयार्थ पहिल्यादां धर्म

आणि देवळं हीं बेचिराख करायला पाहिजेत!' तो माझा त्या वेळचा आवेश मला अजूनहि आठवतो! आणि तोच देवाधर्माविरुद्ध मतप्रचार करणारा माणूस आज जीवनविश्रांतीकरितां या देवळाच्या चौथऱ्यावर येऊन बसला आहे!

"–आणि मला आज त्याहि बालपणच्या प्रचाराचं हसूं येतं आहे, आणि आजच्या माझ्या या परिस्थितीचंहि हसूं येत आहे! आपल्याला येवढ्यांतच कंटाळा आला असला तर जा! आज ऐवढंच पुरें! पुन्हा आपल्याला कधीं सवड झाली तर पुढचा भाग सांगेन–" तो आपल्या चौथऱ्यावर जाऊन बसला आणि त्यानें आपली नेहमींची न बोलती बैठक घेतली!

"आपल्याला त्रास होत असेल तर जातों मी! नाहीं तर आजची सबंध रात्र जरी जागरण करावं लागलं आपली हकीकत ऐकण्याकरितां तरी माझी तयारी आहे!"

"तर मग माझ्या आयुष्यांत आजचा दिवस सोन्याचाच उगवला म्हणायचा!" त्यानें आजूबाजूला निरखून पाहिलें.

सर्वत्र शांत होतें!

कुठल्या तरी एका घराच्या दाराशीं फक्त एक कुत्रा भुंकत होता; आणि त्याच्याच कुठें तरी शेजारीं दहा दिवसांतलें एक मूल रडतांना ऐकूं येत होतें! एका बाजूनें कुणी तरी स्वतःशींच मंजुळ स्वरांत गात होतें, तेंहि ऐकूं येत होतें; आणि कुठें तरी एका घरांत कांहीं तरी वादविवाद चालला होता.

"हं—" त्यानें सुरुवात केली. "धर्म ही अफू आहे हें माझं मत मीं आपणांस सांगितलं यावरून मी सुशिक्षित आहे हें आपण ओळखलं असेलच! पण मी आतां तुम्हांला माझी पुरती हकीकत सांगतों–मी बी.ए., एल्‌एल्‌.बी. आहे! मी या गांवचा राहणारा नाहीं. माझ्या गांवाचं मी आतां नांवहि सांगत नाहीं– किंवा असं समजा, हेंच माझं गांव आहे—हें माझं गांव नाहीं असं मीं पहिल्यांदा म्हटलं तें साफ विसरून जा!" आणि तो माझ्याकडे पाहून एकदां सौम्य हसला.

"—माझ्या जन्मापासूनच्या आठवणी एखादे वेळेला मी आठवूं लागतों

तेव्हां मला मोठी मौज वाटते. अगदीं बाळपणापासून माझं आयुष्य सुखांत गेलेलं—आईबापांना मी एकुलता एक–मला एकहि बहीण अगर भाऊ झालाच नाहीं! तेव्हां माझं कोडकौतुक किती झालं असेल याची कल्पनाच करा! अशा सर्व तऱ्हेनं सुसज्ज परिस्थितींत माझ्या भावना वाढल्याच नाहींत– माझी बुद्धि वाढत होती आणि भावनेपेक्षां मी बुद्धीवरच जास्त जगत होतों. योग्य वेळीं माझे आई-वडील वारले. तत्पूर्वीच माझं लग्न झालं होतं. कादंबरी-नाटकांतील स्त्रीसौंदर्याचीं वर्णनं जिच्यावरून ओवाळून टाकावींत अशा सुंदर स्त्रीचा मला पत्नी म्हणून लाभ झाला होता–" तो किंचित् स्वस्थ बसला. आणि आतां किंचित् ओलसर झालेले आपले डोळे त्यानें आपल्या फाटक्या धोतरानें जरा पुसल्यासारखे केले.

" मी आपल्या वडिलांना एकुलता एक होतों; पण मला तीन मुलगे आणि दोन मुली झाल्या! माझीं मुलं देखणीं आणि गुणी होतीं! मी वकिली करीत होतों. माझी प्राप्तीहि चांगल्यापैकीं होती. माझीं मुलं इतकीं गुणी होतीं, कीं माझ्या कोणत्याहि एका पोराकरितां मीं माझ्या सर्वस्वाचा त्याग केला असता! एखाद्या वेळीं रात्रीं मी माझ्या पत्नीसकट पोरंबाळं घेऊन चांदण्यांत बसे! पण माझं वर आकाशाकडे कधीं लक्षच गेलं नाहीं! माझीं पोरंबाळं मला नक्षत्रांसारखीं आणि चांदण्यांसारखींच वाटत होतीं!

"—मला स्नेहीसोबतीहि खूप होते. त्यांचं आगतस्वागतहि माझ्याकडे चांगलं होई—

"—अर्थात् त्यांत कित्येक रंगेल वृत्तीचेहि होते– ते आणि माझे स्नेही गरीब नव्हते तरी जीविताची आतषबाजी करण्याकरितां लागणारा खर्च करण्याइतके मात्र ते श्रीमंत खचित नव्हते! आणि त्यांना आपल्या जीवनाची आतषबाजी तर करावीशी वाटत होती—मग माझ्यासारखा त्यांचा श्रीमंत स्नेही आतषबाजींत ओढल्याशिवाय त्यांची चैन कशी चालणार होती?

"—आणि आपण विश्वास ठेवा अगर ठेवूं नका– मी मात्र मनानं स्वच्छ होतों. पहिल्या पहिल्यांदा मी गाण्याबजावण्यांत सामील झालों—माझ्या वृत्ति गाण्यांत तल्लीन झाल्या–कांहीं सुंदर गाणारणी माझ्या परिचित झाल्या

